


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १३ वें ] सप्टेंबर १९६० [ अंक १२



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष तेरावें
अंक बारावा

सप्टेंबर
१९६०





वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

प्राज्ञपाठशाला-मण्डळ-ग्रंथमाला

# धर्मकोश

# संस्कारकाण्ड

भाग १ ला

**सुपररॉयल साइज, पृष्ठसंख्या ९००, किंमत ४५ रु.**

संस्कारकाण्डाचा प्रथम भाग प्रकाशित झाला आहे. या भागांत संस्कारांसंबंधीं सामान्य विचार, गोत्र, प्रवर व सापिण्डय यांसंबंधीं विस्तृत शास्त्रार्थ, विवाहकाल, विवाहाचे प्रकार इत्यादि विषय आलेले आहेत. धर्मशास्त्राचें आधुनिक पद्धतीनें संशोधन करणाऱ्या संशोधकांस व प्राचीन पण्डित-याज्ञिक यांसही हा भाग अत्यंत उपयुक्त असल्यामुळें संग्राह्य आहे.

मिळण्याचें ठिकाण — प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ जि० उत्तर सातारा ]

# सार-संकलन

## रशिया आणि चीन

गेले कांहीं महिने रशिया आणि चीन यांमध्यें, साम्राज्यवादाचें खरें स्वरूप आणि जागतिक युद्धाची शक्यता या विषयावर जोराचें वाग्युद्ध चालूं आहे. चिनी नेत्यांची अशी भूमिका आहे कीं साम्राज्य-वादाचें आक्रमक स्वरूप कधीं बदलूं शकणार नाहीं; म्हणून युद्ध टाळतां येईल अशी कल्पना करून घेऊन आणि शांततामय सह-जीवनाचा पुरस्कार करून रशियन नेते कम्युनिस्ट गटांची शक्ति कमी करण्याला कारणीभूत होत आहेत. याउलट U-२ चें प्रकरण घडेपर्यंत, आणि कांहीं अंशीं त्यानंतरहि, रशियन नेत्यांचा तर्क असा होता कीं पाश्चात्य गट स्वतः होऊन युद्ध करणार नाहीं, कारण युद्ध झाल्यास त्याचा सर्वनाश होईल; तसेंच युद्ध होण्याची जी थोडीबहुत शक्यता आहे ती त्या गटाशीं आज चालूं असलेलें शीतयुद्ध थांबवून नाहींशीं करतां येईल. उलट शीतयुद्ध चालूं ठेवल्या-मुळें परिस्थिति चिघळण्याचा संभव आहे कीं त्यांतून युद्ध पेटण्याचा खरोखर धोका निर्माण होऊं शकेल, या वैचारिक संघर्षाच्या पार्श्वभूमीवर "प्रवदा" आणि "कम्युनिस्ट" हीं रशियन नियतकालिकें आणि "रेडफ्लॅग" हें चिनी नियतकालिक यामध्यें आलेल्या लिखाणाचा गोषवारा "मँचेस्टर गार्डियन" (जून १६ व जून २३) मध्यें व्हिक्टर झॉर्झा यानें दिला आहे. खालील मजकूर या दोन अंकांतून घेतला आहे.

"१३ जूनच्या" प्रवदानें चिनी नेत्यांवर, त्यांच्या नांवाचा उल्लेख न करतां, कम्युनिस्टांमध्यें महाभयंकर समजल्या जाणाऱ्या अपमानांचा वर्षाव केला आहे. लेनिनच्या 'डाव्यांगटाचा साम्यवाद—एक बालिश विकार' या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या चाळिसाव्या वार्षिक दिनाच्या निमित्तानें छापलेल्या तीन स्तंभी लेखांत डाव्या गटाची बालिशता, अतिरेकीपणा, दुराग्रहीपणा, सकुंचितता, इत्यादि शब्द प्रामुख्यानें दिसत आहेत. प्रवदानें असेंहि सूचित केलेलें दिसतें कीं या लेखाचा उद्देश इति-हासाची उजळणी नसून समकालीन प्रश्नांचें स्पष्टी-करण आहे—आणि तेंहि मुख्यतः चिनी नेत्यांकरितां प्रवदा म्हणतें :

"आजच्या आन्तरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळी-तले डावे लोक म्हणतात कीं, हातांत सत्ता असली कीं आम्हीं मधले टप्पे गाळून लगेच कम्युनिझ-मची सुरवात करूं शकूं; परंतु हें म्हणणें चूक आणि सत्याला सोडून आहे. असलीं विधानें लेनिनवादाशीं विसंगत आहेत...संकुचित डावेपणाच्या ज्या विशिष्ट प्रवृत्तींना लक्षांत ठेवून लेनिननें आपलें पुस्तक लिहिलें होतें त्या प्रवृत्ती आधुनिक काळातहि दिसत आहेत. कांहीं लोकांचा असा चुकीचा समज आहे कीं, वेगवेगळ्या राज्यव्यवस्था असलेल्या देशांमध्यें शांततामय सहजीवनाचा पुरस्कार करणें आणि आंतरराष्ट्रीय मैत्री भक्कम करणें, साम्यवादी आणि भांडवलशाही राष्ट्रांच्या नेत्यामध्यें वाटाघाटी होऊं देणें—या गोष्टी करणें म्हणजे मार्क्सवाद आणि लेनिनवाद याच्या परंपरेपासून च्युत होणें होय."
परंतु असें करणें म्हणजे ध्येयच्युति असा अर्थ होत नाहीं हें दाखविण्याकरितां लेनिनचें उदाहरण देऊन प्रवदानें क्रुश्चेव्हचें विधान उद्धृत केलें आहे कीं "मार्क्सवाद- लेनिनवाद याच्या पायावर आम्हीं पहाडासारखे निश्चल उभे आहोंत आणि पुढेंहि तसेंच राहूं."

दुसऱ्या आठवड्यांत चिनी कम्युनिस्ट पक्षाच्या प्रमुख वैचारिक नियतकालिक 'रेड फ्लॅग' मध्यें वर दिलेल्या रशियन टीकेस प्रत्युत्तर आलें आहे. **रेड फ्लॅगचें** म्हणणें थोडक्यांत असें :

" साम्राज्यवादानें आपलें आक्रमक आणि युद्ध-पिपासू धोरण सोडून दिलें आहे असें सिद्ध करण्यास कोठलाहि पुरावा नसतांना आपल्याला हवे असलेले निष्कर्ष काढण्याकरितां तर्कपद्धतीचा वाटेल तसा उपयोग करणारे कांहीं लोक अजून आहेत. हे लोक म्हणतात कीं आधुनिक शस्त्रें अशीं आहेत कीं साम्राज्यवादानें युद्ध सुरू केलें तर त्याचाच नाश होईल आणि म्हणून साम्राज्यवाद आपण होऊन युद्धाचा त्याग करील. परंतु असें समजणें म्हणजे आत्मवंचना करणें होय. कारण कीं साम्राज्यवादी व्यवस्थेंत असलेले अंतर्विरोध इतक्या खोलवर गेलेले असतात कीं युद्ध करण्याशिवाय तिला गत्यंतर नसतें. येथें मनुष्याच्या इच्छेचा प्रश्नच नाहीं." आणि म्हणून चिनी नेत्यांचें असें मत दिसतें कीं साम्राज्यवादी हिंस्रपशु मानवजातीवर युद्धाची आपत्ति ओढूं शकण्यापूर्वीच, जरूर वाटल्यास त्याचा नाश करण्यास पुरेल इतकें आपलें निर्णायक वर्चस्व कम्युनिस्ट गटानें सिद्ध केलें पाहिजे.

शिखर परिषदेच्या अगोदर रशियन नियतकालिकांत चीननें सुरू केलेल्या कम्यून प्रयोगावर पहिल्यादां टीका आली होती. रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या प्रेसिडियमच्या सदस्य **कुझीनीनने** लेनिनचें सूत्र आजच्या परिस्थितीला चुकीनें लावण्यांत असणाऱ्या धोक्याची सूचना दिली होती. शिखर परिषद फिसकटल्यावर ती चीनच्या दडपणामुळें फिसकटली असें समजणाऱ्यांना वाटत होतें कीं त्यानंतर रशियन नियतकालिकांत चीनच्या धोरणावर परत टीका येणार नाहीं. परंतु वर उल्लेख केलेल्या गोष्टींमुळें असें दिसतें कीं क्रुश्चेव्हला शिखर परिषद उधळून लावण्यास भाग पाडणाऱ्या शक्तींचा स्वपक्षांतर्गत विरोध हाहि एक महत्त्वाचा घटक असला पाहिजे. तसेंच चीनशीं चाललेल्या वाग्युद्धांतील खरे दोन पक्ष केवळ रशियन विरुद्ध चिनी कम्युनिस्ट पक्ष नसून क्रुश्चेव्ह गट विरुद्ध रशियांतलेच कडवे स्टॅलिनवादी कम्युनिस्ट आणि चिनी कम्युनिस्ट असें असण्याचा संभव जास्त आहे. तें कांहींहि असो, ज्या रशियन तर्कांना 'रेड फ्लॅग" उत्तर देत आहे ते इतके क्रुश्चेव्हवादी आहेत कीं दोन वर्षाहून अधिक काळापासून धुमसत असलेला हा वाद आतां केव्हांहि उघडपणें सुरू होईल असें वाटूं लागलें आहे. परंतु असें झालें तरी ( आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें ) चीन आणि रशियामध्यें फूट पडेल असें समजण्याचें कारण नाहीं. उलट, चीनचें वाढतें दडपण, आम्हीं तुटेपर्यंत ओढण्यास तयार आहोंत असें दाखवून मॉस्कोच्या धोरणाला आपल्याला मान्य असें वळण लावण्याच्या उद्देशानें प्रेरित असण्याचा संभव आहे."

## पूर्वजर्मनींतील असंतोष

दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेल्या लोकशाही राष्ट्रांतील जनतेचे अनेक महत्त्वाचे प्रश्न अजून सुटले नाहींत म्हणून हताश झालेली कांहीं मंडळी कम्युनिस्ट राष्ट्रांनीं त्याच काळांत केलेल्या प्रगतीकडे बोट दाखवितांना आढळतात. भारत आणि चीन याची या बाबतींत तुलना आपल्याकडे अनेक विचारवंत करीत असतात. पूर्वजर्मनी भारत स्वतंत्र होण्याच्या अगोदरच अस्तित्वांत आलें असतांना तेथील परिस्थिति आज जवळ जवळ पंधरा वर्षांनंतर कशी आहे याची थोडी कल्पना येण्यास **मँचेस्टर गार्डियनच्या** जून १६ च्या अंकांतून घेतलेला संपादकीय मदत करेल असें वाटतें.

" पूर्वजर्मनीच्या सर्व भागांत यावेळीं कम्युनिस्ट चौकशी कोर्टें ( Communist assizes ) काम करूं लागलीं आहेत – कदाचित् १९५३ जूनची आठवण होऊन हीं कोर्टें बसलीं असतील ( १९५३








मध्यें पोट्सडान या औद्योगिक शहरांत कामगारांनीं कम्युनिस्ट राजवटीविरुद्ध बंड पुकारलें होतें; रशियन लष्कराच्या मदतीनें त्याचा निःपात करण्यांत आला होता.) हेर उल्ब्रीक्ट (पूर्व जर्मनीचा कम्युनिस्ट नेता) हें जाणून आहे कीं रशियन लष्करी साहाय्य आहे तोंपर्यंत आपल्या राजवटीविरुद्ध खुलें बंड होण्याची शक्यता अजिबात नाहीं; परंतु तो हेंहि जाणून आहे कीं कांहीं सुधारणा झाली असली तरी लोकांत मोठ्या प्रमाणांत असंतोष पसरलेला आहे. अन्नधान्य आणि इतर अत्यावश्यक वस्तूंचा पुरवठा अनेकदां फार अनिश्चित असतो; घरटंचाई आहे आणि घरदुरुस्तीची अशक्यता आहे; अनेक क्षेत्रांत उत्पादनांत सुसूत्रतेचा अभाव आहे. एककेंद्रीय नियोजन पद्धतीमुळें उपक्रमशीलता जवळजवळ नाहींशी झाली आहे. वस्तुस्थिती अशी आहे कीं समाजवादी श्रमनायक आतां कंटाळूं लागले आहेत. पक्षाच्या लायप्झीग शाखेच्या चिटणीसानें पक्षमेळाव्यांत म्हटल्याप्रमाणें जनतेला आतां कळूं लागलें आहे कीं घोषणांनीं पोट भरत नाहीं.

परंतु पूर्वजर्मनीचें दुखणें यापेक्षां अधिक खोलवर पोहोचलें आहे. वर उल्लेख केलेल्या पक्ष चिटणीसानें प्रतिनिधींना हेंहि सांगितलें कीं सर्व कम्युनिस्ट संघटना विचारप्रणालीच्या दृष्टीनें सुषुप्तावस्थेंत आहेत. केवळ सामान्य सभासदच नव्हेत तर त्यांचे नेतेसुद्धां चर्चा आणि विचारसंघर्ष टाळण्यास आतुर असतात. ... कम्युनिझमची माहिती करून घेण्याकरितां सर्व संधी असल्यातरी असें दिसतें कीं पूर्वजर्मनीचे बहुसंख्य नागरिक अजून संपन्न समाजाचीं स्वप्नें बाळगत आहेत. या जीवनदृष्टीविरुद्ध वैचारिक संघर्ष सुरूं करण्याचें प्रतिनिधींना आवाहन करण्यांत आलें आहे. आणि तरीहि त्याच वक्त्यानें सांगितल्याप्रमाणें अनेक कारखान्यांत एकच प्रतिक्रिया दिसून येते कीं, "कृपया आम्हांस (वैचारिक) शिक्षण" देण्याच्या भानगडींत पडूं नका. योचना परिपूर्ण करण्याकरितां करावी लागणारी काळजी आम्हांस पुरून उरत आहे."

## अमेरिकेचा टिटो ?

युनायटेड स्टेट्स आणि क्यूबा यांचे संबंध जवळच्या भविष्यकाळांत अधिकच बिघडण्याचा संभव आहे. या प्रश्नांची खालीं दिलेली माहिती **मँचेस्टर गार्डियन** ( जून ९ ) **युनायटेड स्टेट्स इन्फॅर्मेशन सर्व्हिसनें** काढलेलें पार्श्वभौमिक परिपत्रक ( जुलै १२ ), आणि **रॅडिकल ह्युमॅनिस्ट** ( १७ जुलै ) या साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेली क्यूबन विरोधी नेता प्रा. ए. एस्. आरेंगो यांनीं बर्लिन येथें दिलेली एक मुलाखत—यांवर आधारलेली आहे.

**मँचेस्टर गार्डियन** आपल्या संपादकीय लेखांत म्हणतें : "या देशांत ( इंग्लंड ) अनेक लोकांना अमेरिकेबद्दल सहानुभूति वाटेल. डॉ. कॅस्ट्रो हा कांहीं मोठा आवडण्यासारखा शेजारी नाहीं. कर्नल बॅटिस्टाच्या सरकाराइतकेंच त्याचें सरकार दडपशाहीवर आधारलेलें आहे, आणि अमेरिकेला दुखविण्यांत त्यानें विलक्षण प्रतिभा दाखविली आहे. विरोधकाना त्यानें फार्सवजा चौकशी नंतर गोळ्या घातल्या आहेत, आणि त्याच्या गोतावळ्यांत कम्युनिस्टहि असण्याचा संभव आहे. तरीहि आजच्या दुःखद परिस्थितीस खुद्द अमेरिकेचें धोरण अंशतः जबाबदार आहे. हवाना- ( क्यूबाची राजधानी- ) हून होणाऱ्या शिव्यांच्या भडिमारांत अमेरिकन सरकारने एकंदरींत बरीच सहनशीलता दाखविली आहे. परंतु केवळ सहनशीलतेनें भागत नाहीं. कारण अखेर हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं अमेरिकेचा पाठिंबा असलेल्या सरकारला पदच्युत करून डॉ. कॅस्ट्रो सत्तेवर आला आहे. मग त्यानें अमेरिका विरोधाखेरीज इतर कांहीं व्हावें अशी अपेक्षा तरी अमेरिकेनें कां करावी ?

मन्रो सिद्धांताला दैवी उपपत्ति आहे असें समजणारे आणि म्हणून पश्चिम गोलार्धांत अमेरिकन

वर्चस्वाला तितकाच गूढ आधार देणारे अमेरिकेंत जे लोक आहेत ते डॉ. कॅस्ट्रोचे रशियाशीं सख्य करण्याचे प्रयत्न पाहून हतबुद्ध झाले आहेत. परंतु खरें पाहतां युगोस्लाव्हियानें पाश्चात्य देशाशीं जें सख्य केलें होतें अगदीं त्यासारखेंच हें आहे. डॉ. कॅस्ट्रो हा अमेरिकेचा टिटो आहे. युगोस्लाव्हियानें पाश्चात्य मदतीचा स्वीकार केल्यामुळें आर्थिक क्षेत्रांत अनिर्बंध स्वातंत्र्य आणि लोकशाही कारभार यांचा त्यानें स्वीकार केला असा निष्कर्ष काढतां येत नाहीं; तसेंच क्यूबानें रशियाशीं व्यापारी करार केला म्हणून त्याचा अर्थ असा होत नाहीं कीं क्यूबाचें सरकार कम्युनिझमकडे सहानुभूतीनें पाहात आहे. स्वतःचें राष्ट्रीय स्वातंत्र्य जपण्याच्या काळजींत असलेल्या लहान देशाला एखाद्या विशिष्ट विचार-प्रणालीवर आधारलेलें परराष्ट्रीय धोरण परवडूं शकणार नाहीं. सोळाव्या शतकांतल्या इंग्लंडसारखें त्याला दोन मोठाल्या गटांतल्या स्पर्धेचा फायदा घ्यावा लागतो. याचा पाश्चात्य देशांनीं राग मानतां कामा नये. दूरवर विचार करतां असें दिसून येईल कीं तटस्थ राष्ट्रें तटस्थ राहावींत यांत आपलें हित आहे – आणि तटस्थ याचा अर्थ जशीं रशियाशीं संलग्न नसलेलीं तशींच आपल्याशीहि संलग्न नसलेलीं, असा होय.

युनायटेड स्टेट्स इन्फर्मेशन सर्व्हिसनें काढलेलें पार्श्वभौमिक परिपत्रक म्हणतें :

" सत्य परिस्थिति अशी आहे कीं अमेरिकन धोरण इतर देशांपेक्षां क्यूबाला नेहमींच जास्त अनुकूल राहिलें आहे. उदाहरणार्थ १९३४ मध्यें जेव्हां अमेरिका साखरेच्या आयातीकरितां कोटा पद्धतीचा अवलंब करूं लागली होती तेव्हां अध्यक्ष रूझव्हेल्टनें क्यूबाचें आर्थिक पुनर्जीवन होण्यास मदत होईल अशी पद्धत स्वीकारण्याची खास शिफारस केली होती. त्यानंतरहि प्रत्येक अध्यक्षानें या धोरणाचा अवलंब केला आहे. या पद्धतीनुसार अमेरिकेला दरवर्षी लागणाऱ्या साखरेच्या एक तृतीयांशाहून अधिक भाग, जगांत प्रचलित असलेल्यापेक्षां कितीतरी जास्त किमतीनें, क्यूबानें पुरविला आहे. क्यूबाच्या वार्षिक साखर-उत्पादनाचा जवळजवळ निम्मा भाग अमेरिका घेत होती, आणि तो सुद्धां अशा किंमतीनें कीं ज्यामुळें क्यूबाला दरवर्षी ५० कोटी रुपयाच्या आसपास अधिक फायदा मिळत होता. गेल्या आठवड्यांत क्यूबाकडून घेण्याच्या कोट्यांत अमेरिकेनें जी कपात केली आणि इतर देशांतून जास्त साखर आयात करण्याचें जाहीर केलें, तें आपला साखरपुरवठा क्यूबाच्या मर्जीवर अवलंबून राहूं नये, या उद्देशानें होय.

दुसरें असें कीं अमेरिकेविरुद्ध क्यूबन सरकारनें स्वीकारलेला कार्यक्रम आर्थिक युद्धासारखा आहे. क्यूबांत गुंतविलेलें २५० कोटी रुपयांइतकें अमेरिकन भांडवल जवळजवळ कांहीं मोबदला न देतां क्यूबन सरकारनें जप्त केलें आहे* किंवा स्वतःकडे व्यवस्थेकरितां घेतलें आहे. त्याबरोबरच क्यूबन सरकार सोव्हिएट युनियन आणि इतर कम्युनिस्ट देशाबरोबर व्यापारी करारांची बोलणीं करीत होतें, आणि त्यामुळें आक्रमक व प्रसारशील अशा कम्युनिस्ट आंतरराष्ट्रीय चळवळींचा शिरकाव पाश्चात्य गोलार्धांत होण्याचा धोका निर्माण झाला आहे. अशा परिस्थितींत क्यूबन सरकारच्या कृती आणि उद्दिष्टें याबद्दल विश्वास वाटणें थोडें अवघड आहे.

याशिवाय क्यूबन सरकारनें अमेरिकेहून होणाऱ्या आयातीवर कडक निर्बंध घातले आहेत. १९५८ मध्यें क्यूबा अमेरिकेंतून दरमहा २५ कोटी रुपये किंमतीचा माल आयात करीत होतें; आतां तो आंकडा दरमहा साडे अकरा कोटीवर आला आहे,

* हें लिहित असतांना आणखी १५० कोटि रुपयांइतकें भांडवल जप्त केल्याची बातमी आली आहे – का. सं. (८-८-१९६०).

आणि या रकमेबद्दलसुद्धां फार थोडया अमेरिकन निर्यातकारांचें येणें मिळालें आहे."

प्रा. आरेंगो हा क्यूबन विरोधी पक्षाचा एक महत्त्वाचा नेता होय. बॅटिस्टाच्या कारकिर्दीत तो भूमिगत झाला होता. त्यापूर्वींच्या शेवटच्या लोकशाही सरकारांत तो शिक्षण आणि परराष्ट्रमंत्री होता. त्याचबरोबर हवाना विद्यापीठांत कायद्याचा प्राध्यापक होता. फिडेल कॅस्ट्रो ( सध्याचा हुकूमशहा ) तेथें त्याचा एकेकाळीं विद्यार्थी होता. प्रा. आरेंगोनें बॅटिस्टा सरकारला उलथून पाडण्याचे अनेक प्रयत्न केले होते, परंतु त्यानें मागविलेला दारूगोळा जहाजासकट बुडाला किंवा जप्त झाला, त्यामुळें त्याला यश आलें नाहीं. बॅटिस्टा पूर्व सरकारचा एक संशयातीत चारित्र्याचा मंत्री म्हणून त्याची ख्याति होती. प्रा. आरेंगोनें खाली दिलेली ही मुलाखत जूनमध्यें बर्लिन येथें घेऊन **फोरम सर्व्हिसनें** प्रसृत केली आहे.

**प्रश्न :** कॅस्ट्रोची राजवट लोकप्रिय आहे का ?

**उत्तर :** एके काळीं ती फार लोकप्रिय होती. १९५९ जानेवारींत क्यूबाचे ९५ टक्के श्रमजीवी लोकांचा तिला पाठिंबा होता असें म्हणतां येईल. परंतु आतां तिच्या चाहत्यांची संख्या जलदगतीनें रोडावत चालली आहे. आज त्यांची संख्या ३५ते४० टक्याहून अधिक असण्याचा संभव नाहीं.

**प्रश्न :** याचें कारण म्हणून आपण काय सांगाल ?

**उत्तर :** क्यूबांचे लोक बॅटिस्टाच्या हुकूमशाही विरुद्ध लोकशाही दृष्टिकोनांतून आणि लोकशाही राज्यघटना मिळविण्याकरितां लढत होते. माझें स्वतःचें व इतरांचेंहि असें मत होतें कीं कॅस्ट्रो आणि त्याचे अनुयायीहि याच ध्येयाकरितां "सिएरा मेस्ट्रा" या डोंगरांतून बॅटिस्टाविरुद्ध युद्ध करीत होते. ते म्हणत होते कीं, आम्ही लोकशाही आणि राज्यघटना याकरितां लढत आहोंत, आणि अठरा महिन्यांच्या आंत स्वतंत्र निवडणुकांचें त्यांनीं आश्वासन दिलें होतें. वस्तुतः १९५८ च्या मध्यापासून ते लोक कम्युनिस्टांच्या संपर्कात होते आणि त्यांच्या मनांत लोकशाहीपेक्षां दुसरेंच कांहींतरी घाटत होतें. १९५९ पासून ते लोक क्यूबामध्यें सर्वंकष हुकूमशाहीची स्थापना करूं लागले आहेत. त्यांनीं बॅटिस्टाला पाठिंबा देणाऱ्याचीच नव्हे तर बॅटिस्टाविरुद्ध लढणाऱ्यांची आणि कॅस्ट्रोच्या लढ्यास मदत करणाऱ्यांचीहि मिळकत जप्त केली आहे.

**प्रश्न :** क्यूबामध्यें जमीनवांटपांत झालेल्या सुधारणेबद्दल आम्हीं फार ऐकलें आहे; खरोखर प्रगति कितपत झाली आहे ? आणि सर्वसाधारण आर्थिक परिस्थिति कशी आहे ?

**उत्तर :** हा फार महत्वाचा प्रश्न आहे, कारण कीं क्यूबन राजवटीचा हा मानबिंदू आहे. या लोकांनीं क्यूबन शेतकऱ्याला जमिनी देण्याचें आणि सहकारी यंत्रणा लावून देण्याचें आश्वासन दिलें होतें. परंतु त्यांतलें कांहीं केलेलें नाहीं. त्यानीं खाजगी जमिनी जप्त करून सरकारजमा केल्या आहेत. खाजगी जमीन-मालकांच्या ऐवजी आतां इन्रा ( शेतीविषयक सुधारणेची राष्ट्रीय संस्था ) जमीनमालक बनली आहे; आणि ही संस्था म्हणजे क्यूबाचें महाशासन होय. म्हणून शेतकऱ्याची स्थिती पूर्वीं सारखीच आहे; परंतु क्रान्तिपूर्व काळापेक्षां आतां त्यांचें उत्पन्न निम्में झालें आहे. आतां त्यांचें वेतन पैशाऐवजीं कुपन-स्वरुपांत दिलें जात आहे. आणि म्हणून आपली खरेदी त्याना सरकारी " जनता स्टोअर्स " मधून करवी लागते. हीं स्टोअर्स इन्राच्या मालकीचीं असतात.

**प्रश्नः**— याचा आर्थिक परिस्थितीवर काय परिणाम झाला आहे ? या बदलांमुळें उत्पादनावर परिणाम झाला आहे काय ?

**उत्तर :** क्यूबन शेतकऱ्याचें जीवनमान खालावलें आहे हें उघड आहे. कारण कीं त्यांचें उत्पन्न निम्में झालें आहे. गुरें आणि कुरणें सरकारजमा झालीं आहेत आणि त्यांची आर्थिकदृष्ट्या अकार्यक्षम










व्यवस्था होत आहे. क्यूबाच्या शेतउत्पादनाच्या बाजारपेठा जाऊं लागल्या आहेत.

आर्थिक क्षेत्रांत वेतनकपात झाली आहे, आणि कामगारांना आपल्या वेतनाचा १७ टक्के भाग कर म्हणून "स्वेच्छे"नें द्यावा लागत आहे. हें प्रमाण आणखी वाढेल हें जवळजवळ निश्चित आहे. क्यूबाची अर्थव्यवस्था मोडकळीस आली आहे, कारण कीं क्यूबा आयातीवर अवलंबून असलेला देश आहे, आणि कच्चा तथा तयार माल आयात करण्यास आमच्याकडे डॉलर नाहींत. याचा अर्थ असा कीं अनेक लहान लहान स्टोअर्स आणि कारखाने बंद करावे लागले आहेत. आणि आतां बेकारीचें प्रमाण पूर्वीच्या दुप्पट झालें आहे. पूर्वी साठ लाखाच्या लोकसंख्येंत पांच लाख बेकार असत; आतां बेकारांची संख्या दहा लाख झाली आहे.

प्र: सोव्हियेट–क्यूबनकरार क्यूबाच्या लोकांना हितावह ठरेल का ?

उ: नाहीं. वस्तुस्थिती अशी आहे : पूर्वी आम्हीं रशियाला दरवर्षी तीन ते साडेतीन लाख टन साखर विकत होतो आणि त्याबद्दल रशियाकडून आम्हांला डॉलर मिळत होते. आतां रशिया आमच्याकडून दहा लाख टन साखर घेणार आहे. हें आमच्या फायद्याचें दिसत आहे; परंतु तें खरें नाहीं. कारण पूर्वी आम्ही लंडन करारानुसार १८ लाख टन साखर खुल्या बाजारांत विकत होतों. त्यांतून हे दहा लाख टन वजा करावे लागतील म्हणजे आमची साखर निर्यात वाढली नाहीं. तसेंच रशिया आतां आम्हांस केवळ वीस टक्के, म्हणजे दोन लाख टन, साखरे-करितां डॉलर देणार आहे; उरलेल्या आठ लाख टनाच्या बदल्यांत तो आम्हांला पेट्रोल, शेतकी –अवजारें इत्यादि देईल म्हणजे आम्ही खालच्या प्रतीचा माल वरच्या किंमतीनें घेणार, परंतु आमची साखर मात्र जागतिक किंमतीपेक्षां कमी किंमतीनें रशियाला देणार. यावर रशियाकडून येणाऱ्या मालावर वहातूक खर्चहि जास्त असणार.

प्र. क्यूबामध्यें कम्युनिस्ट प्रभावाबद्दल बरेंच सांगितलें गेलें आहे. हा प्रभाव खरोखर कितपत आहे तें आपण सांगू शकाल का ?

उ. हा प्रकार "प्रभाव" म्हणण्यापलिकडे गेला आहे, अशी मला भीति वाटते. सरकारी संस्था, लष्कर, नौदल आणि हवाईदल या सर्वांमध्यें वरिष्ठ जागांवर आपले सभासद असणारा फक्त कम्यु-निस्ट पक्ष होय. इनराचे व्यवस्थापक आणि कॅस्ट्रोचे कांहीं मंत्री कम्युनिस्ट पक्षाचे सभासद आहेत. हें लोकपक्षाचें कार्ड धारण करणारे सभासद आहेत. त्याखेरीज सहप्रवासी लोक आहेतच.

प्र. क्यूबांत राजकीय स्वातंत्र्य कितपत आहे ?

उ. आजचा अंदाज असा आहे कीं सहा हजार लोक तुरुंगांत आहेत. नुकतीच आम्हांस माहिती मिळाली आहे कीं ऑरिअँत प्रॉव्हिन्सच्या एका आडबाजूच्या विभागांत एक कॉन्सेंट्रेशन कॅम्प उभारण्यांत आला आहे.

प्र. वर्तमानपत्रावर निर्बंध कितपत आहेत ?

उ. वर्तमानपत्राची संपूर्ण मुस्कटदाबी केली गेली आहे. पूर्वी क्यूबांत कितीतरी स्वतंत्र वर्तमानपत्रें होतीं. परंतु बॅटिस्टाच्या राजवटींत कडक सेन्सरशिप लादण्यांत आली. आतां सर्व वर्तमानपत्रें सरकारच नियंत्रित करीत असल्यामुळें सेन्सरशिपची गरजच उरली नाहीं.

प्र. कॅस्ट्रोचें राजकीय तत्त्वज्ञान कोणतें आहे ?

उ. कॅस्ट्रोची केस ( case ) वेगळीच आहे. – वस्तुतः तो फिडेल वादी ( कॅस्ट्रोचें नांव फिडेल आहे–का. सं. ) आहे; तो कम्युनिस्ट आहे असें मला वाटत नाहीं.

प्र. कॅस्ट्रोच्या स्वतःच्या हातांत सत्ता कितपत आहे ?





अनुक्रमणिका

उ. क्यूबन राजवटींत खुद्द कॅस्ट्रोच्या हातांत सर्वसत्ता नाहीं. राजकीय हेतूकरितां क्यूबाचा उपयोग करून घेण्याची कम्युनिस्टांची एक सुसंयोजित योजना आहे. म्हणून क्यूबाचा आर्थिकविकास घडवून आणण्यांत त्यांना रस नाहीं. त्यांची खरी उद्दिष्टें खालीलप्रमाणें आहेत. प्रथमतः युनायटेड स्टेट्सला क्यूबामध्यें हस्तक्षेप करण्यास भाग पाडणें आणि त्या हस्तक्षेपाचा प्रचाराकरितां उपयोग करून घेणें; दुसरें, संपूर्णतः एकतर्फी प्रचार करून क्यूबन लोकांना कम्युनिझमला अनुकूल करून घेणें आणि तिसरें, लॅटिन अमेरिकेत कम्युनिस्ट प्रचाराकरितां क्यूबाचा तळ म्हणून उपयोग करून घेणें.

प्र. कांहीं काळापूर्वी आपला खून करण्याचा प्रयत्न झाला होता आणि म्हणून आपण क्यूबा सोडला. या प्रकाराबद्दल आपण कांहीं सांगू शकाल का ?

उ. स्वातंत्र्य आणि लोकशाही तत्त्वें यांकरितां झटणाऱ्या अशा **ॲसोसिएशन फॉर लिबर्टी ॲण्ड डिमॉक्रसी** या आंतर–अमेरिकन संस्थेतर्फे पुरस्कृत सेकंड कॉन्फरन्स फॉर फ्रीडम् ॲण्ड डिमॉक्रसी व्हेनेझुएलात भरली होती, तिला मी हजर राहण्याकरितां गेलो होतो. पहिली कॉन्फरन्स १९५० मध्यें हवानांत मी शिक्षणमंत्री असतांना माझ्या पुरस्काराखालीं भरली होती.

या कॉन्फरन्सच्या उद्दिष्टांला कम्युनिस्टांचा विरोध होता. म्हणून मी हवानाला परततांना माझा खून करण्याची योजना त्यांनीं केली. विमानतळावरच कॅस्ट्रोच्या सैनिकाच्या मदतीनें माझा खून करण्याचा प्रयत्न केला, परंतु माझें स्वागत करण्यास जमलेल्या जनसमुदायामुळें तो सफल होऊं शकला नाहीं. एका लॅटिन अमेरिकन वकिलातींत मी आश्रय घेतला आणि नंतर क्यूबाच्या बाहेर निसटून आलों.

## लष्करी हुकुमशाही लोकशाहीला पर्याय नव्हे

लष्करी हुकूमशहाकडे लोकशाही राजवटीच्या उणीवापासून जनतेला मुक्ति देणारा त्राता म्हणून पाहणें कसें अदूरदर्शीपणाचें आहे, याचें एक उदाहरण सुदाननें नुकतेंच दाखवून दिलें आहे. खालील मजकूर ' मँचेस्टर गार्डियन 'च्या दि. १६ जूनच्या अंकांतून घेण्यांत आला आहे :

" ॲडल्ट एज्युकेशन " ( " प्रौढ शिक्षण " ) या नियतकालिकाच्या एका अलिकडच्या अंकांत मँचेस्टर विद्यापीठाच्या बहिःशाल विभागाचे असोशिएट डिरेक्टर मि. डब्लु. इ. स्टायलर यांनीं एक शोचनीय कहाणी सांगितली आहे. सुदानमध्यें १९५८ सालीं एका कामगार शिक्षण संघटनेनें कामगारांकरितां वर्ग सुरू केले, आणि तिला त्यांत लगेच यश आलें. वेगवेगळया शहरांत इतके कामगार नांवें नोंदवू लागले कीं वर्गावर संख्येची कमाल मर्यादा लावावी लागली. या वर्गामुळें असें दिसून आलें कीं असे कितीतरी श्रमजीवी कामगार होते कीं, ज्यांचें शिक्षण अगदीं थोडें आणि प्राथमिक स्वरुपाचें झालें होतें आणि तरीहि त्यांनीं अतिशय कष्ट सोसून पुस्तकें जमविलीं होतीं आणि आपला बराचसा वेळ तीं वाचण्यांत ते घालवीत होते. त्यांच्यामधूनच ( या शिक्षणवर्गामुळें ) नवीन कामगार नेता निर्माण होऊं लागला होता. असा नेता कामगार चळवळींतल्या नव्या मनूचा प्रतिनिधी ठरला असता. तसेंच हा शिक्षणसंपर्क कामगाराइतकाच शिक्षकांना महत्वाचा वाटू पहात होता. बुद्धिजीवी वर्ग आणि इतरवर्ग यांच्या मधला दुवा दृढ करणाऱ्या चळवळीचें महत्त्व विकासाच्या मार्गानें परिक्रमण करणाऱ्या देशांची परिस्थिती माहीत असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला पटेल. वर उल्लेख केलेलें शिक्षणकार्य सुशिक्षित सुदानी तरुणाच्या ध्येयवादाला पूर्वी कधीं न मिळालेल्या संधीसारखें होतें. परंतु १९५८ मध्यें जनरल अबूद दरबार क्रान्तीच्या जोरावर सत्तेवर आला.












त्यानंतर कांहीं महिन्यांनीं कामगार शिक्षणसंघटनेवर बंदी घालून तिचें विसर्जन केलें गेलें, आणि तिची मालमत्ता सरकारजमा करण्यांत आली. मि. स्टायलर सरकारी कृत्याचें कारण देऊं शकत नाहींत परंतु ते म्हणतात कीं, " सरकारी निर्णयाचें तात्कालिक कारण कांहींहि असो, त्याचें खरें कारण समजणें सोपें आहे. हुकूमशाही राजवटींत विचारस्वातंत्र्य आणि चर्चास्वातंत्र्य यांचा पुरस्कार करणारी संघटना टिकणें अशक्य आहे. सुदानी कामगार संघटना ही, सुदानी लोकसत्ताकाचें वैशिष्ट्य मानतां येईल असा लोकशाहीवरील विश्वासाचा एक शेवटचा आविष्कार होता."

---

श्री. अद्वयानंद गळतगे

# अणुयुग आणि उत्क्रांति

१९४५ साली हिरोशिमावर अणुबाँबचा स्फोट झाल्यानंतर पहिल्यांदा जगाला अणुशक्तीच्या प्रचंड सामर्थ्याची जाणीव झाली. त्यानंतर हळुहळु अणुयुग हा शब्दप्रयोग वापरांत येऊं लागला. पण या अणुयुगाचा पाया पन्नास वर्षांपूर्वीच घातला गेला होता. कारण हिरोशिमाच्या बाँबमधून जन्मलेल्या क्ष-किरणांचा शोध रॉंटजन या जर्मन शास्त्रज्ञानें १८९५ साली लावला होता. आणि या किरणांनीं जपानी नागरिकांमध्यें जे रोग दिसून आले ते सर्व रोग–बोन कॅन्सर, ल्यूकेमिया इत्यादि–कित्येक लोकांना पुष्कळ वर्षांपूर्वी झाले होते. इतकेच नव्हें तर कित्येक लोक ( यांत मादाम क्यूरी व इतर अनेक शास्त्रज्ञांचाहि समावेश होतो ) या रोगांनीं मेलेहि होते. प्रत्यक्ष बाँबचें तत्त्वसुद्धां आईन्स्टाइन यानीं १९०५ सालींच आपल्या वस्तूच्या अविनाशित्वा-( Conservation of mass ) च्या सिद्धांतानें सांगितलें होतें. या सिद्धांताप्रमाणें वस्तु ही शक्तीचेंच एक स्वरूप असून ती शक्तीमध्यें पूर्णपणें परिवर्तनीय आहे. आणि बाँबमध्यें हेंच तत्त्व अंतर्भूत आहे. तेव्हां विसाव्या शतकाची सुरुवातच अणुयुगानें झाली असें म्हणायला हरकत नाहीं.

अणुयुगाची सुरुवात विसाव्या शतकाबरोबर झाली असली तरी अणुबाँबचा स्फोट घडवून आणायला मनुष्याला विसाव्या शतकाचा मध्य गाठावा लागला. याचें कारण मनुष्याचें अणुविषयीचें ज्ञान त्या काळापर्यंत अपूर्ण होतें.[1] अणूचें विदलन घडवून आणायला जें हत्यार त्याला पाहिजे होतें त्या न्यूट्रॉनचा १९३२ सालीं चॅडविक या इंग्रज शास्त्रज्ञानें शोध लावला आणि अणुविज्ञानांत क्रांतिच घडवून आणली. या न्यूट्रॉननेंच बाँबला जन्म दिला आणि अणुयुग अस्तित्वांत आणलें असें म्हटलें तर तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. या न्यूट्रॉनच्या साहाय्यानेंच फर्मी आणि झिलार्ड यांनीं १९४२ साली शिकॅगो विद्यापीठाच्या आवारांत इतिहासांतील पहिली अणुभट्टी कार्यान्वित केली. आणि त्यानंतर केवळ तीनच वर्षांनीं हिरोशिमावर अणुबाँबचा पहिला प्रयोग झाला.[2] अशा रीतीनें जरी आइन्स्टाईनांच्या सिद्धांताला ४० वर्षांनीं पुरावा मिळाला तरी तो त्यांच्या सिद्धांताचा विजयच असल्यामुळें लोक आइन्स्टाईनना 'अणुबाँबचे जनक' म्हणूं लागले. आणि आइन्स्टाईननीं रुझवेल्टना अणुबाँब तयार करण्याची योजना हातीं घेण्यासाठीं स्वतःच्या सहीनें एक पत्र लिहिलेलें असल्यामुळें ते अणुबाँबचे नैतिक जनकहि ठरले आहेत !

## अणुबाँब–उत्क्रांतीमधील एक दशा

आईन्स्टाईन हे बाँब तयार करण्यास कारणीभूत झालेले असल्यामुळें दोन लक्ष जपानी नागरिकांच्या हत्त्येची नैतिक जबाबदारी त्यांच्यावरच येते असें कोणी म्हणेल. प्रत्यक्ष बाँबच्या निर्मितीबद्दल त्यांना जबाबदार धरलें तरी त्याचा उपयोग करणाऱ्या राजकीय धुरीणांनाच त्याचा दोष पोहोंचतो असें म्हणणें शक्य आहे. पण या तर्कपद्धतीप्रमाणें विचार केल्यास राजकीय पुढाऱ्यांना तरी कसा दोष देतां येईल ? प्रत्यक्ष विमानांतून बाँबचा स्फोट करणारा मनुष्यच या विचारसरणीप्रमाणें खरा दोषी ठरतो. पण हा त्याच्यावर मोठाच अन्याय होईल[3]. वस्तुस्थिति अशी आहे कीं आईन्स्टाईनना या जबाबदारींतून पूर्णपणें मुक्त करतां

१. हल्लीसुद्धां त्याचें अणुविषयीचें ज्ञान पूर्ण आहे असें नाहीं. कारण अणुमधील सर्व कणांचा अजून शोध लागलेला नाहीं. आतापर्यंत अणुमध्यें २७ कण सांपडले असून दर वर्षी एकाद्या नवीन कणाचा शोध लागत आहे.

२. अर्थात् याच्या पूर्वी ॲलमोगोर्डो येथें अणुबाँबचा एक चाचणीप्रयोग घेण्यांत आला होता.

३. असें सांगतात कीं प्रत्यक्ष विमानांतून बाँब टाकणाऱ्या या माणसाला नंतर त्या कृत्यामुळें वेड लागलें, हें पाहून जपानी जनतेनें त्याच्या कुटुंबियाना सहानुभूतीपर संदेश पाठविला. म्हणजे स्वतः जपानी जनतेनेंच या माणसावर नैतिक जबाबदारी नाहीं हें मान्य केलें आहे.

येत नाहीं. पण केवळ आईन्स्टाईनना जबाबदार धरणेंहि चुकीचें ठरेल. कारण बाँबला आवश्यक असणाऱ्या गोष्टींचा ( न्यूट्रॉन, युरेनियम-विदलन, साखळी-प्रतिक्रिया इ. ) शोध अगोदर इतर शास्त्रज्ञांनी लावल्यामुळेंच त्यांना बाँबची योजना सुचली. पण खरें म्हणजे प्रत्यक्ष बाँबची कल्पना त्यांना सुचलीच नव्हती. झिलार्ड, एडवर्ड टेलर, फर्मी, विग्नेर इत्यादींनां ती सुचली होती. वास्तविकरीत्या या शास्त्रज्ञांपैकींच एकानें ( झिलार्डनें ) आईन्स्टाईनना रुझवेल्टना पत्र लिहिण्यास भाग पाडलें होतें. आणि आईन्स्टाईननीं पत्र लिहिलें नसतें तरी अणुबाँब अस्तित्वांत आलाच असता.

वस्तुस्थिति अशी आहे कीं अणुबाँबची जबाबदारी सर्वच अणुवैज्ञानिकांची आहे. त्यासाठीं विशिष्ट शास्त्रज्ञाला अगर व्यक्तीला जबाबदार धरणें चुकीचें आहे. पण सर्वच वैज्ञानिकांना जबाबदार धरणें तरी कितपत समंजसपणाचें होईल ? वास्तविकरीत्या 'जबाबदार' हा शब्दच अयोग्य आहे. अणुबाँब हा मानवी उत्क्रांतीमधील एक टप्पा आहे. जीवशास्त्रीय परिभाषा वापरावयाची झाल्यास तें एक सांस्कृतिक उत्परिवर्तन (Cultural mutation) आहे. आणि जीवशास्त्राहून भिन्न असें हें सांस्कृतिक उत्परिवर्तन उपकारक किंवा अपकारक ठरणें हें सर्वस्वीं मानवाच्या बौद्धिक प्रगल्भतेवर अवलंबून आहे. आणि ही गोष्ट मानवी विचारांत घडून आलेल्या मूलभूत बदलामुळें स्पष्ट झाली आहे. सहजीवन ( Co-existence ) हा शब्द अणुशक्तीमुळेंच अस्तित्वांत आलेला आहे. कारण या बाँबनें शत्रु व मित्र यांच्यामधील भेदच नष्ट केला आहे !

## अणुयुग आणि शक्तिक्रांति

अणुयुग हा शब्द आतां आपल्या व्यवहारांत रूढ झालेला आहे. युद्धांत या अणूनें दोन लाखांवर लोक मारले असून शांततेच्या काळीं मनुष्याच्या त्यानें पाणबुडया चालविल्या आहेत; इतकेंच नव्हे तर कांहीं ठिकाणी विजेनें घरेंसुद्धां प्रकाशित केलीं आहेत. तेव्हां हा शब्दप्रयोग सार्थ वाटणें स्वाभाविक आहे. पण ज्या अर्थानें आपण यंत्रयुग हा शब्द वापरतो त्या अर्थानें अणुयुग हल्लीं अस्तित्वांत आलें आहे असें म्हणणें चूक ठरेल. कारण यंत्रयुगाच्या प्रारंभीं यंत्रशक्ति ज्याप्रमाणें मानव व प्राणिशक्तीशी आर्थिक दृष्टीनें स्पर्धा करूं शकली तसें अणुशक्ति ही तूर्त तरी कोळसा, तेल व पाणी यांच्याशी आर्थिक दृष्टीनें स्पर्धा करूं शकत नाहीं. पण कांहीं वर्षांनीं असें स्पर्धाशील अणुयुग अस्तित्वांत येणार आहे याविषयी संशय बाळगण्याचें कारण नाहीं.[४] याला पुरावा म्हणजे मानवाच्या शक्तीची वाढती गरज होय. आणि अणुयुग हें या वाढत्या गरजेला अनुसरून घडून आलेली शक्तिक्रांतीच ( Energy revolution ) होय.

ही शक्तिक्रांति अभूतपूर्व म्हटली पाहिजे. इतिहासांत या क्रांतीला तोडच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. तुलनाच करावयाची झाल्यास विस्तवाच्या शोधानें झालेल्या क्रांतीशी करतां येईल. विस्तवाचा शोध लागण्यापूर्वी मनुष्याला स्नायुबलाचाच काय तो उपयोग माहीत होता. या दृष्टीनें मनुष्याची अवस्था इतर वन्य पशूहून निराळी नव्हती. पण विस्तवाचा शोध लागताक्षणींच साराच मनु पालटला. विस्तवामुळें मनुष्याच्या खाद्यपदार्थांचें क्षेत्र वाढून केवळ त्याच्या अन्नांतच बदल घडून आला असें नव्हे तर लाकडाचा ओंडका मध्यभागी जाळून नावा तयार करणें, क्रूर प्राण्यांना पळवून लावणें इत्यादी गोष्टीमुळें त्याच्या उत्क्रांतीची दिशाच बदलली. विस्तवाचा उपयोग इतर प्राण्यांना करतां येत नसल्यामुळें, उलट ते त्याला भिऊन पळत असल्यामुळें मानवानें त्याला उपयोग करून उत्क्रांतीमध्यें एक मोठेंच पाऊल टाकलें. किंबहुना विस्तवामुळेंच त्याला त्याची 'मानवता' मिळाली असें म्हटलें तरी चालेल.

विस्तवाच्या शोधामुळें मानवाच्या विकासक्रमाला जसें क्रांतिकारक वळण मिळालें तसें या शक्तिक्रांतीनेहि मिळणार आहे यात संशय नाहीं. फक्त हें वळण वाईट असेल कीं चांगलें हें ठरावयाचें आहे. आणि हें ठरविणें सुदैवानें मानवाच्या हातांत आहे. कांहीं आशावादी लोक थोडा अत्युक्तीचा दोष पत्करून म्हणतील कीं विस्तवानें पशूचा जसा मानव झाला तसें अणुशक्ती-

४. लास ॲलमॉस येथें युरेनियमपासून मिळणाऱ्या उष्णतेचें सरळ विद्युच्छक्तीमध्यें परिवर्तन करण्याच्या मार्गाचा शोध लागला असून तो पूर्णपणें यशस्वी झाला तर टर्बाइनची आवश्यकता न उरता आर्थिकदृष्ट्या इतर वीज-निर्मितीच्या साधनाशीं स्पर्धा करणाऱ्या अणुशक्तीचा शोध लागल्यासारखें होणार आहे.

मुळें मानवाचा देव होण्याचीहि शक्यता आहे! कांहीं-जण हैड्रोजन बॉंबमुळें युद्ध अशक्य झालें आहे असें म्हणतात. हें जर खरें असेल तर मनुष्याची योग्यता देवापेक्षाहि जास्त वाढली आहे असें म्हटलें पाहिजे. कारण देवहि अधूनमधून आपापसांत युद्ध करीत असतात!

हैड्रोजन बॉंबमुळें युद्ध अशक्य झालें आहे या विधानाचा अर्थ असा होतो कीं मनुष्याला मिळालेल्या प्रचंड शक्तीमुळें त्याला नैतिक बनणें भाग पडलें आहे. बुद्ध, क्रिस्त, गांधी इत्यादी जे करूं शकले नाहींत ते या हैड्रोजन बॉंबने केलें आहे! हे महात्मे जेव्हां शेजाऱ्याशीं प्रेमानें वागायला सांगत होते तेव्हा त्यांच्या नजरेसमोर बहुतेक घरचा शेजारी होता. पण हैड्रोजन बॉंबनें जगांतील प्रत्येक मनुष्याला एकमेकाचा शेजारी करून सारी मानवता बंधुत्वाच्या रज्जूनें बांधून टाकली आहे. म्हणजे एका अर्थानें या महात्म्यापेक्षाहि मोठी कामगिरी या बॉंबनें बजावली आहे! पण हैड्रोजन बॉंबवर आधारलेली ही नैतिक इमारत त्या बॉंबच्या स्फोटाबरोबर कोसळणार हें उघड आहे. खोडकरपणा करणाऱ्याना संधि मिळाली आहे हें कबूल केलें पाहिजे![5]

## पृथ्वी दोनदां निर्मनुष्य करतां येईल

वर म्हटल्याप्रमाणें आईन्स्टाईननी वस्तु आणि शक्ति यांच्या समीकरणाचा सिद्धांत १९०५ सालींच प्रसिद्ध करून पदार्थविज्ञानांत क्रांति घडवून आणली होती. पण १९४५ सालच्या ऑगस्टमहिन्यापर्यंत ती क्रांति असेल असें कांहीं वेचक शास्त्रज्ञ सोडले तर कुणालाच वाटलें नव्हतें. त्या वर्षी मात्र जगाला त्याची जाणीव झाली. इतकेच नव्हें तर त्या क्रांतीची किंमत म्हणून २४०००० लोकांचा बळी द्यावा लागला. मानवाच्या सदसद्विवेकबुद्धीला एवढा जबर धक्का कधींच बसलेला नाहीं असें म्हणतात. तो जबर धक्का होता खरा. पण तो इतके लोक मेले या गोष्टीचा नव्हता. तर इतके लोक इतक्या थोड्या प्रयत्नानें मेले या गोष्टीचा होता. जे लोक मारण्यासाठीं ४,५०,००००० पौंड दारू लागली असती ते लोक मारण्यासाठीं फक्त २ पौंड प्ल्यूटोनियम पुरेसा आहे हा खरोखरीच धक्का होता. शक्तिक्रांतीची ती पहिली सूचना होती. मानवाला, चेंडूएवढ्या जळणावर आपल्या पाणबुडी जहाजानें साठ हजार मैलांचा प्रवास केला आहे अशी गर्वोक्ति– जी १९ व्या शतकांत लहान मुलांच्या गोष्टींतील परींच्या तोंडीं शोभली असती– करणें शक्य झालें आहे तें या शक्तिक्रांतीमुळेंच होय. ७०० टन कोळसा जाळून जितकी वीज निर्माण होईल तितकी वीज निर्माण करण्यासाठीं अणुशक्ति वापरण्याचें ठरविल्यास किती युरेनियम लागेल असें वाचकांना वाटतें? फक्त पांच औंस! पृथ्वी निर्मनुष्य करण्याची शक्ति मानवाला आतां मिळाली आहे असें कां म्हटलें जातें हें यावरून स्पष्ट होईल.

जपानवर टाकलेल्या बॉंबच्या शेकडोंपट शक्तिमान् बॉंबचा स्फोट आतां मानवानें घडवून आणला आहे. आणि त्यापेक्षाहि हजारोपट शक्तिमान् बॉंब तयार करणें शक्य आहे! (कारण अणुबॉंबप्रमाणें हैड्रोजन बॉंबला तात्विक दृष्ट्या प्रमाणाची मर्यादाच नाहीं!) अशा परिस्थितींत शास्त्रज्ञांना पृथ्वी ही तळहातावरच्या आंवळ्यासारखी वाटावी (अर्थात् विध्वंसाच्या दृष्टीनें!) यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

पण प्रत्यक्षांत पृथ्वी ओसाड पाडण्याइतकी शक्ति हल्ली मानवाजवळ आहे काय? हा प्रश्न 'व्यावहारिक दृष्टी'च्या नात्यानें विचारार्ह असलेने त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. रॉल्फ लॅप् या बॉंबयोजनेवर काम केलेल्या अमेरिकन अणुशास्त्रज्ञाच्या अंदाजाप्रमाणें हल्लीं बड्या राष्ट्राजवळील विध्वंसक अणुशक्ति $३ \times १०^{१०}$ टन टी. एन्. टी. इतकी आहे. या अंदाजावर हिशेब करायचा झाल्यास तिसरें महायुद्ध झालें आणि त्यामध्यें सारी अणुशक्ति उपयोगांत आणली तर पृथ्वीचा फक्त ०·०६७ इतकाच भाग निर्मनुष्य होईल, असें म्हणावें लागतें. पण फक्त ०·०६७ भाग म्हणजे १३१३०००० चौ. मैल क्षे. आणि २०,००००००० लोक![6] पण हा सरासरी हिशेब आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. म्हणजे पृथ्वीवर चोहोकडे बॉंब अस्ताव्यस्त फेकले आहेत असें गृहीत धरलें आहे. पण प्रत्यक्षात बॉंब हे कोणी अस्ताव्यस्त फेकीत नाहींत! जास्तीत

---

५. उलट खोडकरपणामुळें अगर अपघातानें अणुयुद्ध होणार नाहीं असेंहि कांहींजण म्हणतात.

६. या हिशेबांत प्रत्येक बॉंबची शक्ति १५ मेगॅटन गृहीत धरली असून किरणोत्सर्गप्रसाराचें प्राणहानीकारक क्षेत्रफळ ७००० चौ. मैल धरलें आहे.



अनुक्रमणिका

जास्त हानि घडवून आणण्यासाठीं अचूक नेम धरून दाट लोकवस्तीच्या शहरावरच ते टाकले जातील. तेव्हां वरील हिशेबांत क्षेत्रफळ बरोबर असलें तरी नेम अचूक साधल्यास ( आणि तसा तो आधुनिक रॉकेटनें साधतां येतो हें रशिया व अमेरिका या दोघांनींहि प्रयोगानें दाखवून दिलें आहे ). मानवप्राणहानि वरील संख्येच्या चार पट ( ८० कोटि ) होईल, असें साधारणपणें समजायला हरकत नाहीं. [ वास्तविकरीत्या न्यूयॉर्कसारख्या शहरावर बॉंब टाकल्यास मानवप्राणहानीची संख्या वीस पट ( ४०० कोटि ) होते ! पण सर्वच शहरें इतकीं मोठीं नसल्यामुळें ही संख्या फक्त चार पट धरली आहे ].

पण हे बॉंब पृथ्वीवर सर्वत्र फेकले आहेत असें आपण गृहीत धरलें आहे. पण समुद्रावर कोणी बॉंब टाकणार नाहीत. पृथ्वीचा ७१ टक्के भाग ( सुमारे १४ कोटि चौरस मैल क्षेत्रफळ ) हा पाण्यानें व्यापलेला आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. आणि या भागावर कोणी बॉंब टाकणार नसल्यामुळें तो विचारातून पूर्णपणें वगळला पाहिजे. आणि उरलेल्या भागाचा विचार केल्यास मेलेल्यांची संख्या २८० कोटि होते. ही संख्या बरोबर पृथ्वीवरील लोकसंख्येइतकी आहे !

पण हा १९५७ सालचा अंदाज आहे. त्यानंतर विध्वंसक अणुशक्तीचा साठा दुप्पट झाला आहे असा अंदाज आहे. म्हणजे हल्ली मनुष्याजवळ असलेली अणुशक्ति पृथ्वी दोनदा निर्मनुष्य करण्यास समर्थ आहे ! [७]

## जननप्रक्रियेवर गंडांतर

कांहीं दिवसापूर्वी फ्रान्सने आपल्या बॉंबचा स्फोट केल्यामुळें पुन्हा बॉंबच्या चाचणीप्रयोगाविरुद्ध लोकमत जागृत झालें आहे. चीनहि आपल्या बॉंबचा स्फोट करणार असल्याची भुमका उठली होती. भारतानें, आपण बॉंब तयार करूं शकतो पण तयार करूं इच्छित नाहीं असा आपला नीतिधैर्ययुक्त निर्णय जाहीर केला आहे. जसजशी अणुबॉंब बाळगणाऱ्या राष्ट्रांची संख्या वाढत जाईल तसतसा युद्धाचा धोकाहि वाढत जाईल असा इषारा पुष्कळांनीं दिला आहे. हा धोका बाजूला सारला तरी चाचणीप्रयोग करून हीं राष्ट्रें वातावरण अधिकच दूषित करण्याचा धोका आहे हें कोणीहि मान्य करील. कांहींजण या चाचणीप्रयोगांना विरोध करण्याचें कारण असें सांगतात कीं, या चाचणीप्रयोगामुळें वातावरणांतील किरणोत्सर्गाची पातळी (Radiation level) हळुहळु पण अजाणतेपणें वाढत आहे. आणि एके दिवशी ती अशा थराला पोहोंचेल कीं त्यामुळें सबंध मानव जातीला गंभीर धोका निर्माण होईल. हा युक्तिवाद चुकीचा आहे असें मला म्हणावयाचें नाहीं. पण हा युक्तिवाद पूर्ण सत्य सांगत नाहीं. स्ट्रॉंटियम– ९० या हाडाचा कॅन्सर निर्माण करणाऱ्या २८ वर्षें आयुष्याच्या धातूविषयी हा युक्तिवाद बरोबर आहे. पण जननप्रक्रियेंत बदल घडवून आणणाऱ्या क्ष-किरण, गामा-किरण इत्यादींच्या बाबतींत ही 'निर्णायक पातळी'ची विचारसरणी चुकीची ठरते. कारण त्यांची पातळी कितीहि लहान असली तरी हे किरण आपलें कर्तव्य चोख बजावतात. स्ट्रॉंटियम–९० चें हाडांतील कॅल्शमशीं प्रमाण विशिष्ट मर्यादेला पोहोंचलें तरच बोन कॅन्सर होतो. पण क्ष-किरणानें जननपेशीवर जो परिणाम होतो तो असा प्रमाणमर्यादेवर अवलंबून नाहीं. क्ष-किरणांच्या १०० रॉंटजननें [८] जो परिणाम होतो, तोच परिणाम १ रॉंटजननेहि होतो. याचें कारण जननपेशीत उत्परिवर्तन ( mutation ) घडवून आणण्यास फार थोड्या किरणोत्सर्जन शक्तीची आवश्यकता असते. वस्तुतः फार उत्सर्जनशक्तीचा वापर केला तर जननपेशी नष्टच होते. आणि मनुष्य वांझ होतो. यावरून जास्त उत्सर्जनशक्तीपेक्षां थोड्या शक्तीपासूनच मनुष्याला धोका आहे हें स्पष्ट होईल, आणि वांझपणापेक्षां उत्परिवर्तन

७. ॲटॉमिक एनर्जी कमिशनर मि. थॉमस मुरे यानीं पृथ्वी कितीतरी वेळा निर्मनुष्य करण्याइतकी अणुशक्ति हल्ली मानवाजवळ आहे असें विधान केल्याचें प्रसिद्ध झालें आहे. हें विधान प्रथमदर्शनी अविश्वासार्ह वाटलें तरी तसें मुळींच नाहीं. कारण बॉंबचें उत्पादन हीं राष्ट्रें मोठ्या ( कारखानदारी ) प्रमाणावर करीत असतात. एक बातमी अशी आहे कीं या कारखानदारी पद्धतीच्या बॉंब उत्पादनामुळें अमेरिका प्रत्येक हैड्रोजन बॉंब केवळ ३ लक्ष डॉलरला तयार करूं शकते. एरवी त्याची किंमत ५० कोटि डॉलरच्या वर आहे.

८. 'रॉंटजन' हें किरणोत्सर्ग मोजण्याचें एक परिमाण आहे.



अनुक्रमणिका

ह्याच विकासाच्या दृष्टीनें अधिक हानिकारक आहे. कारण सामान्यतः उत्परिवर्तनें हीं घातुक असतात.

तेव्हां जननप्रक्रियेच्या दृष्टीनें वातावरणांतील किरणोत्सर्ग पातळी धोक्याची नसून स्फोट केलेला प्रत्येक बॉंब धोक्याचा आहे ही गोष्ट स्पष्ट होईल. चांचणीप्रयोगांना बंदी घालतां येत नसेल तर निदान त्यांना मर्यादा तरी घालावी हें म्हणणें कसें अज्ञानमूलक आहे हें यावरून वाचकांच्या ध्यानांत येईल.

किरणोत्सर्गानें उत्परिवर्तन घडून येतें हा महत्त्वाचा शोध लावल्यामुळें ज्यांना नोबेल पारितोषिक मिळालें त्या अमेरिकन जननशास्त्रज्ञ हर्मन मुलर यांच्या अंदाजाप्रमाणें १९४५ च्या बॉंबस्फोटानें जपानी जनतेमध्यें जितकीं उत्परिवर्तनें घडून आलीं तितकीं उत्परिवर्तनें आतांपर्यंतच्या चाचणीप्रयोगामुळें केवळ अमेरिकेंतच घडून आलीं आहेत[९]. हा अंदाज त्यांनी अमेरिकेच्या 'ॲटॉमिक एनर्जि कमिशन'– (जे हे चाचणीप्रयोग करते त्या कमिशन– ) च्या किरणोत्सर्गांच्या डोसच्या अंदाजावर आधारला आहे. या कमिशनच्या अंदाजाप्रमाणें अमेरिकन जनतेच्या जननपेशीला आतांपर्यंतच्या चाचणीप्रयोगामुळें ०·१ रॉंटजन मिळालें आहे. हिंदुस्थानच्या जनतेच्या जननपेशीला यापेक्षांहि जास्त रॉंटजन मिळाले असले पाहिजेत. कारण हे चाचणीप्रयोग आशियांतील राष्ट्रांना जवळ असलेल्या बेटांतच केले जातात. (अमेरिकेचें एनिविटॉक बेट हें आशियापासून केवळ दोन हजार मैल अंतरावर आहे. उलट हे चाचणीप्रयोग करणारीं राष्ट्रें अशा बेटांपासून कमीत कमी सहा ते आठ हजार मैल अंतरावर असतात.) पण हा १९५५ सालचा अंदाज आहे. त्यानंतर कितीतरी हैड्रोजन बॉंबचे चाचणीप्रयोग झाले असून हा आंकडा १ रॉंटजनला जाऊन पोहोंचला आहे. प्रो. मुलर यांच्या पद्धतीनें १ रॉंटजन हा आंकडा धरून हिशेब करायचा झाल्यास हिंदुस्थानाच्या जनतेच्या जननपेशीला जो किरणोत्सर्ग पोहोंचतो तो ३८ कोटी रॉंटजन (man-roentgen) होय. प्रो. मुलर यांच्या हिशेबाप्रमाणें अमेरिकन जनतेच्या जननपेशीला १९५५ पर्यंतच्या चाचणीप्रयोगामुळें १·६ कोटि रॉंटजन मिळालें आहे. हिंदुस्थानाच्या जनतेच्या जननपेशीला मिळालेल्या ३८ कोटी रॉंटजनशी या आकड्याची तुलना करतां असें म्हणणें भाग आहे कीं, १९४५ च्या बॉंबस्फोटामुळें जपानी जनतेमध्ये जितकीं उत्परिवर्तनें घडून आलीं त्याच्या तेवीस पट उत्परिवर्तनें आतां पर्यंतच्या चाचणीप्रयोगांमुळें हिंदुस्थानाच्या जनतेमध्यें घडून आलीं आहेत. याचा अर्थ असा होतो कीं हिंदुस्थानांत भविष्यकाळामध्यें लाखोंनीं मुलें गर्भावस्थेत असतानांच नष्ट होतील. आणि जीं जन्मतील तीं अनेक व्यंगांनीं युक्त असतील. हीं व्यंगें शारीरिकच असतील असें नाहीं. तर तीं मानसिकहि असून त्यामध्यें वेडेपणा (mongolism) हें एक मुख्य व्यंग आहे.[१०] ही शांततेच्या काळांतील स्थिति. जागतिक महायुद्ध– अर्थात् अणुयुद्ध– झालें तर काय परिस्थिति निर्माण होईल याची कल्पनाच केलेली बरी !

जननशास्त्राच्या दृष्टीतून बॉंबचा विचार करण्याचें कारण या शक्तिक्रांतीमुळें केवळ पृथ्वी निर्मनुष्य होण्याचीच भीति निर्माण झाली आहे असें नसून उत्क्रांतीच्या नैसर्गिक क्रमाला कृत्रिम आणि म्हणून घातुक वळण लावण्याचा जीवशास्त्रीय धोकासुद्धां निर्माण झाला आहे ही गोष्ट स्पष्ट व्हावी.[११]

## नवीन नैतिक युगाचा उदय

प्राथमिक जीवाचा विकास निरनिराळया प्राण्यामधून होत आला असून शेवटीं त्याचा प्रादुर्भाव मानवी बुद्धींत झाला आहे. मानव या विकासक्रमाचा शेवटचा परिपाक असून तो आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्या-

९. हा १९५५ सालचा अंदाज आहे.

१०. सुमारें ५०० शारीरिक आणि मानसिक रोग वंशपरंपरागत (Hereditary) आणि म्हणून उत्परिवर्तनजन्य आहेत असें जननशास्त्रज्ञांना आढळून आलें आहे.

११. बॉंबऐवजी 'शक्तिक्रांति' हा शब्द वापरण्याचें कारण बॉंबच्या चाचणीप्रयोगापेक्षां वैद्यकीय तपासणीमध्यें मनुष्याला जास्त किरणोत्सर्ग पोहोंचतो असें आढळून आलें आहे. अमेरिकन नागरिकांना एकूण मिळणाऱ्या किरणोत्सर्गापैकीं शेकडा ९० टक्के केवळ वैद्यकीय तपासणीमुळें (एक्स-रे, फ्ल्यूरोस्कोपी इ.) मिळतो असें संशोधनाअंतीं आढळून आलें आहे. आणि याचा परिणामहि स्पष्ट झाला आहे. या किरणोत्सर्गाशी काम करणाऱ्या शास्त्रज्ञांचीं व तंत्रज्ञांचीं मुलें विकृतींनीं युक्त असल्याचा पुरावा आतां सांपडला आहे.



अनुक्रमणिका

मुळें पृथ्वीवरील विकासक्रमाचा विश्वस्त बनला आहे. त्यामुळें मानवाच्या ठिकाणीं विकास भौतिक पातळीवरून मानसिक पातळीवर गेला आहे. या नवीन विकासाचें स्वरूप कसें असेल हें इतक्या लवकर सांगतां यावयाचें नाहीं, कारण मानव पृथ्वीवर अवतरून फार थोडा अवधि लोटला आहे. पण एवढें निश्चितपणें म्हणतां येईल कीं या नवीन विकासाचें स्वरूप केवळ मानसिक राहणार नाहीं, तें नैतिकहि असेल.

मानवाला या पृथ्वीवर अवतरून फार थोडा अवधि लोटला असें जें वर म्हटलें त्यामधील 'थोडा अवधि' हे शब्द उत्क्रांतीला लागणाऱ्या काळाच्या संदर्भांत ध्यानांत घेतले पाहिजेत. हें कळण्यासाठीं आपणाला विकासकालाचा थोडा मागोवा घ्यावा लागेल. पृथ्वीवर प्राथमिक जीव पहिल्यांदा उदय झाला तो सुमारें १०० कोटि वर्षांपूर्वी होय. या प्राथमिक जीवापासून ६० कोटि वर्षांपूर्वी बिनमणक्याच्या (कीटकासारख्या) प्राण्याचा विकास झाला. या बिनमणक्याच्या प्राण्यापासून ४० कोटि वर्षांपूर्वी मणक्याच्या प्राण्यांचा विकास झाला. या मणक्याच्या प्राण्यापासून ६ कोटि वर्षांपूर्वी सस्तन प्राणी जन्मला. आणि या सस्तन प्राण्यापैकीं एकानें ५ लक्ष वर्षांपूर्वी मानवाला जन्म दिला. अशारीतीनें कित्येक कोटि वर्षांमध्यें ज्याची गणना केली पाहिजे तो विकासक्रम मानवाच्या बाबतीत फक्त ५ लक्ष वर्षांपूर्वी सुरूं झाला आहे. किंवा असेंहि म्हणतां येईल कीं ज्या मानवाचा विकास व्हायला १०० कोटि वर्ष लागली तो मानव पृथ्वीवर येऊन केवळ ५ लक्ष वर्षेंच झालीं आहेत. तेव्हा त्याचा खरा विकास अजून सुरूं झालेला नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. कारण ५ लक्ष वर्षांपूर्वी जन्माला आलेला हा मानव पृथ्वी स्थिर असून सूर्यच तिच्याभोवतीं फिरतो, असें इ. स. १५०० पर्यंत म्हणत होता! इतकेंच नव्हे तर मानवासह सर्व जीवांना परमेश्वरानें एका शुभ दिवशीं निर्माण केलें असें तो गेल्या शतकापर्यंत म्हणत होता. आणि मानवापैकींच एखाद्या समूहाला इतरांच्यावर वंशश्रेष्ठत्व (Racial superiority) मिळूं शकतें असें तो अजून म्हणत आहे. तेव्हां मानवाच्या विकासाला नुकतीच सुरुवात झाली आहे असें म्हणतां येईल. आणि अशा या त्याच्या मानसिक शैशवावस्थेंतच अचानकपणें त्याला हैड्रोजन बॉंब मिळाला आहे! आणि या बॉंबनें त्याच्या भोवतालची भौतिक परिस्थितिच बदलून टाकली आहे. भौतिक परिसरात अचानकपणें बदल झाल्यामुळें त्याच्याशीं जुळवून घेतां न आल्यामुळें पुष्कळ प्राणी पृथ्वीच्या इतिहासात नामशेष (Extinct) झाले आहेत. ६ कोटि वर्षांपूर्वी डिनोसॉर या प्राण्यापुढें अशीच परिस्थिति निर्माण झाली होती. फरक इतकाच कीं त्यांच्यापुढील परिस्थिति नैसर्गिक बदलामुळें निर्माण झाली होती. उलट मानवापुढील परिस्थिति मानवानेंच निर्माण केली आहे!

एखाद्याला वाटलें असतें कीं हैड्रोजन बॉंबच्या विध्वंसक शक्तीच्या शोधामुळें मानवाची नैतिक बुद्धि जागृत होईल. पण ही आशा फोल ठरली आहे. उलट मानव या हैड्रोजन बॉंबमुळें 'व्यावहारिक राजकारण' (Practical Politics) खेळण्यांतच अधिक गुंतला आहे. कारण हें बॉंब बाळगणारी राष्ट्रें म्हणतात, "आपल्याजवळ हैड्रोजन बॉंब आहेत म्हणून शत्रू आपल्यावर हल्ला करायला धजत नाहीं." पण हा युक्तिवाद आत्मवंचक आहे. या युक्तिवादानें असें गृहीत धरलें आहे कीं हैड्रोजन बॉंब हें सर्वशक्तिमान् अस्त्र आहे. पण असें समजण्याचें कारण नाहीं. या हैड्रोजन बॉंबपेक्षाहि सामर्थ्यशाली अस्त्राचा शत्रूला शोध लावतां येणार नाहीं कशावरून? ज्या न्यायानें साधा दारुगोळा जवळ असतांना या हैड्रोजन बॉंबचा शोध लावावा लागला त्याच न्यायानें हैड्रोजन बॉंब जवळ असतांनासुद्धां त्यापेक्षाहि सामर्थ्यवान् (न्युट्रिनो?) बॉंबचा शोध लावावा लागेल.[१२] आणि मग त्याहीपेक्षा सामर्थ्यशाली बॉंब शोधून काढावा लागेल. आणि हें थांबणार कुठें? अशाप्रकारें हा युक्तिवाद करणाऱ्यांचा बौद्धिक दिवाळखोरपणा स्पष्ट आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं विध्वंसक शक्तीच्या पायावर शांतता प्रस्थापित करतां येते ही या युक्तिवादाच्या बुडाशी असलेली विचारसरणीच चुकीची आहे. आणि याची जाणीव राजकीय पुढाऱ्यांना होऊं लागली असून ते आतां निःशस्त्रीकरणाची भाषा बोलू लागले आहेत.

१२. रशिया अशा एका बॉंबची योजना आखीत आहे असें कुश्चेवनें कांहीं दिवसापूर्वी जाहीर केलें आहे.

पण निःशस्त्रीकरणाचा त्यांचा मार्ग पाहिला म्हणजे मानवाच्या भवितव्याविषयी काळजी वाटूं लागते. कारण 'शिखर परिषद', 'उच्च पातळीवरची बोलणीं' इत्यादि परंपरागत मार्ग या क्रांतिकारक हैड्रोजन बॉंबच्या बाबतींत निष्फळ ठरणार आहेत. गॅटलंड या लेखकानें म्हटल्याप्रमाणें, "What is overlooked is that the Solution to the H-bomb demands measures as revolutionary as the weapon itself. The truth is that its development has rendered the present world system completely obsolete. It has brought the end of an era!" भौतिक क्रांति घडवून आणणाऱ्या या बॉंबशीं परंपरागत पद्धतीनें व्यवहार न करतां त्या बॉंबसारख्या क्रांतिकारक विचारपद्धतीनें केला तरच तो यशस्वी होईल. कारण या बॉंबने केवळ नवीन भौतिक युगच अस्तित्वांत आणलें आहे असें नसून नवीन वैचारिक आणि नैतिक युगहि अस्तित्वांत आणलें आहे.

## मानवापुढील यक्षप्रश्न

या शक्तिक्रांतीनें मानवापुढें जो पेंचप्रसंग निर्माण केला आहे त्याचें स्वरूप असें आहे कीं त्याची उत्क्रांति अजून अपरिपक्व अवस्थेंत असतांनाच उत्क्रांतीच्या परिपक्व अवस्थेंत आवश्यक असणारी शक्ति त्याला मिळाली आहे. निदान या शक्तीनें निर्माण केलेले प्रश्न सोडविण्याइतकी त्याची नैतिक उत्क्रांति अजून झालेली नाहीं. अशा परिस्थितींत या पेंचप्रसंगातून पार व्हायचें झाल्यास त्याला दोनच मार्ग मोकळे आहेत. एक सर्वनाश किंवा दुसरें नैतिक कायापालट! यापैकीं पहिला मार्ग त्यानें स्वीकारला, म्हणजे नैतिक दुबळेपणामुळें स्वतःचा नाश ओढवून घेतला तर त्याची योग्यता डिनोसॉरहूनहि कमी आहे असें सिद्ध होईल! आणि दुसरा मार्ग स्वीकारला म्हणजे प्रयत्नपूर्वक त्याने नैतिक कायापालट घडवून आणला तर अणुशक्तीनें त्याच्या विकासाला क्रांतिकारक वळण मिळालें असें म्हणतां येईल. मग आपण असें म्हणू शकूं कीं हैड्रोजन बॉंबने मानवाचा सर्वनाश तर केला नाहींच. उलट त्याची नैतिक उत्क्रांतिच घडवून आणली!

हा नैतिक कायापालट (किंवा शक्तिक्रांतीला समांतर अशी नैतिक क्रांति वा उत्परिवर्तन)[१३] मानव घडवून आणू शकेल काय? अणुयुगांतील मानवापुढील हा यक्षप्रश्न आहे. येथें 'नैतिक कायापालट' हे शब्द कांहींतरी जादुगिरीच्या अर्थानें वापरलेले नाहींत. हल्लीं जागतिक वातावरण तंग झालें आहे याचें कारण बड्या राष्ट्रांमधील एकमेकाविषयीचा अविश्वास होय. 'दुसरा काय करील हें सांगतां येत नाहीं,' (unpredictability) ही भावना या अविश्वासाच्या बुडाशी आहे. अविश्वासूपणा (unreliability) हा पशूंचा गुणधर्म आहे. मनुष्यानें हा अविश्वासूपणा टाकून दिला तर तो खरोखरीच त्याचा नैतिक कायापालट म्हणतां येईल. अण्वस्त्रें बाळगणाऱ्या राष्ट्रांपैकी एकानें जरी आपलीं सारीं अस्त्रें नष्ट करून टाकण्याचें नीतिधैर्य दाखविलें तरी त्यामुळे मनुष्याचा नैतिक कायापालट घडून येईल असें निश्चितपणें म्हणतां येईल. या सूचनेला 'अव्यावहारिक' म्हणणें सोपें आहे. पण 'व्यावहारिकपणाची किंमत आतां इतकी महाग झाली आहे कीं ती देणें मानवाला परवडणार नाहीं.[१४]

मानवानें आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यामुळें एकेकाळीं विस्तवानें दिलेलें आव्हान स्वीकारून उत्क्रांतीमध्यें मोठें पाऊल टाकलें आहे. आतां अणुशक्तीनें आव्हान दिलें असून तें स्वीकारून उत्क्रांती मध्यें आणखी एक मोठें पाऊल टाकण्याची संधि त्याला मिळाली आहे. आणि येथेंहि पुन्हां त्याची बुद्धीच त्याला उपयोगी पडणार आहे. पशूंना उपयुक्त ठरलेली नैसर्गिक निवड (Natural Selection) तो पशु नसल्यामुळेंच त्याच्या उपयोगी पडत नाहीं.

हा नैतिक कायापालट घडवून आणण्यांत मानवाला अपयश आलें तर तो पृथ्वीवरून नामशेष होईल काय?

१३. समांतर उत्परिवर्तनें (Parallel mutations) हीं जीवशास्त्रीय जातीमध्यें नेहमीच घडून येत असतात.

१४. निःशस्त्रीकरणाचा मार्ग बड्या राष्ट्रांना पटो अगर न पटो. हल्ली जी दोलायमान परिस्थिति निर्माण झाली आहे तिचें स्वरूपच असें आहे कीं ती आहे त्या स्वरूपांत फार काळ टिकणें अशक्य आहे. मध्यें कांहीं तरी घडून आलेंच पाहिजे. हैड्रोजनबॉंब हें सहजीवनाचें तत्त्व स्वीकारण्याइतकें 'सभ्य' नाहींत!

पृथ्वी ओसाड पाडण्याइतकी विध्वंसक अणुशक्ति हल्लीं मानवाजवळ आहे हें आपण मागें पाहिलेंच आहे. पण तिसरें महायुद्ध झालें तर पृथ्वी ओसाड पडेल असें समजणें वेडेपणाचें ठरेल. फार तर त्यामुळें पृथ्वीवरील एक दशांश लोक मृत्युमुखी पडतील. म्हणजे नामशेष होण्याचा त्याच्यापुढे पर्याय नाहीं. पण संख्येच्या अर्थानें नामशेष होण्याचा आपल्यापुढे प्रश्न नाही हें लक्षात ठेवलें पाहिजे. (अर्थात् संख्येच्या अर्थानेहि तो नामशेष होणारच नाहीं असें समजण्याचें कारण नाहीं. आणि अणुयुद्धाची भयानकता ध्यानांत घेतल्यानंतर या अर्थानें नामशेष होणें बरें असें वाटू लागतें!) मानवानें जर आपल्या विनाशाचें संख्येमध्यें मोजमाप करण्याचें ठरविलें तर त्यानें स्वतःचें नैतिक दिवाळेंच काढलें असें म्हटलें पाहिजे. कारण संख्येमध्यें मोजमाप करण्याचें एकदा ठरविलें कीं मूल्याची आपोआपच हकालपट्टी होते. आणि मूल्याचा विचार बाजूला सारल्यानंतर टॅक्टिकल वेपन वापरायचें कीं स्टॅट्रेजिक वेपन वापरायचें हा 'व्यावहारिक' प्रश्नच काय तो शिल्लक राहतो!

कांही लोक (ज्यांच्यामध्यें टॉयंबीसारखे प्रकांड इतिहासकारहि येतात) मानवाच्या भवितव्यासंबंधीं आशावादी दृष्टिकोन स्वीकारतात. आणि हा दृष्टिकोन स्वीकारण्याचें कारण ते असें सांगतात कीं मानवाला आतां सर्वनाशाची अगदी तीव्रतेनें जाणीव झाली असल्यामुळें तो युद्ध करण्यास धजणार नाहीं. पण ज्या विध्वंसक शक्तीमुळें ही सर्वनाशाची जाणीव त्याला झाली आहे ती विध्वंसक शक्ति जोपर्यंत तो आपल्याजवळ बाळगीत आहे तोपर्यंत हा युक्तिवाद कल्पनारम्यच म्हटला पाहिजे. मनुष्य हीं भयानक अस्त्रें बाळगीत आहे इतकेंच नव्हें तर त्यांचा साठा तो एकसारखे वाढवीत आहे ही गोष्टच त्याच्या बुद्धीच्या रानटी अवस्थेची साक्ष देते. या दृष्टीनें पृथ्वीचा तो अजून खऱ्या अर्थानें विश्वस्त झालेला आहे असें म्हणतां येत नाहीं. ज्या ग्रहावर तीनचतुर्थांश लोक अर्धपोटी आहेत आणि अब्जावधी रुपये विध्वंसक शक्तीसाठी खर्च होतात त्या ग्रहावरील मानवाला विकासाचा उच्च परिपाक कसें म्हणावें? [१५] ज्या ग्रहावर दोन महायुद्धें होऊनहि शस्त्रास्त्रांचा साठा वाढत आहे त्या ग्रहाचा स्वामी म्हणवून घेण्यास मानवाला कसा हक्क पोहोंचतो? मानवाचा बौद्धिक विकास आईन्स्टाईनपर्यंत पोहोंचला असेल. पण नैतिक दृष्ट्या तो अजून वन्य प्राण्याच्या पातळीवरच आहे. जोपर्यंत विकासाच्या या दोन पातळ्या अशा एकमेकापासून दूर आहेत तोपर्यंत तो अर्धमानवच राहणार. या दृष्टीनें विचारं केल्यास तिसरें महायुद्ध झालें नाहीं तर तो एक मोठाच चमत्कार म्हणावा लागेल. पण चमत्कार कित्येकदा घडून येतात. हा चमत्कार मानवाच्या इतिहासात घडून येणार नाहीं कशावरून?

---

१५. केवळ अमेरिकेनेंच आतांपर्यंत कमीतकमी ५०० अब्ज रुपये बॉंब योजनेवर खर्च केले आहेत असा अंदाज आहे. रशियानेहि इतके रुपये खर्च केलेले असणार. इतक्या रुपयांत भारतासारख्या मागासलेल्या देशाच्या दहा पंचवार्षिक योजना होतील.



अनुक्रमणिका






श्री. नी. र. वऱ्हाडपांडे

# प्रयोगिक मानसशास्त्र व शिक्षणविषयक कांहीं प्रश्न

एकोणिसाव्या शतकांतील उदारमतवादी विचारवंतांना शिक्षण हा सर्वच वैयक्तिक व सामाजिक दोषांविरुद्ध रामबाण तोडगा आहे असें वाटत असे. समाजांतील निरनिराळ्या वर्गांत कलह कां आहे तर लोक अशिक्षित आहेत म्हणून, अन्धश्रद्धेचें प्राबल्य कां आहे तर शिक्षणाचा पुरेसा प्रसार झाला नाहीं म्हणून, आर्थिक संपन्नता कां नाहीं तर शैक्षणिक संपन्नता नाहीं म्हणून असें त्यांचें सर्व रोगांचें एक निदान असे. शिक्षणानें ज्या विषयाचें शिक्षण घेतलें त्यांचेंच फक्त आपल्याला ज्ञान होतें असें नसून आपली सर्वांगीण उन्नति होते असा ग्रह या शिक्षणश्रद्धेच्या मुळाशीं होता. लॅटिन भाषा शिकल्यानें फक्त लॅटिनचेंच ज्ञान होतें असें नाहीं, तर लॅटिन व्याकरणाचा व्यवस्थितपणा अंगीं बाणल्यामुळें एकूण सर्व जीवनच व्यवस्थित होतें व प्रत्येक गोष्ट अचूकपणें करण्याची संवय लागते असें त्यावेळचे शिक्षक उघडपणें म्हणत असत.

पण शिक्षण व मानसशास्त्र हीं इतर शास्त्रांप्रमाणेंच कल्पनाविश्वांतून निघून प्रयोगशाळेंत आलीं व वरील सारख्या अनेक मतांची विज्ञानाच्या प्रयोगसिद्ध पद्धतीनें परीक्षा करण्यांत आली तेव्हां त्यांना फारसा आधार नाहीं असें दिसून आलें.

विल्यम जेम्स या प्रसिद्ध अमेरिकन मानसशास्त्रज्ञानें या प्रयोगांना चालना देण्याचें महत्त्वाचें कार्य केलें. मुलांना घोट्या करायला लावल्यानें त्यांची स्मरणशक्ति वाढते अशी त्यावेळीं समजूत होती. ही समजूत कितपत बरोबर आहे हें पाहण्यासाठीं जेम्स व त्याचे विद्यार्थी यांनीं ह्यूगो व टेनिसन यांच्या कविता पाठ करायला किती वेळ लागतो याची नोंद केली. नंतर कांहीं दिवस 'Paradise Lost' चे कांहीं भाग पाठ करण्याचा अभ्यास केला. या अभ्यासामुळें आपली स्मरणशक्ति अधिक तल्लख झाली असेल या आशेनें त्यांनीं पुनः ह्यूगो व टेनिसन यांच्या कविता पाठ करायला पूर्वीपेक्षां कमी वेळ लागतो कीं काय याचा अन्दाज घेतला. त्यावरून पाठान्तराचा सराव केल्यानें स्मरणशक्ति वाढली असें दिसून आलें नाहीं.

### शिक्षण आणि "मनोविकास"

जेम्सचा हा प्रयोग ऐतिहासिक दृष्टया कौतुकास्पद असला तरी त्यांत वैज्ञानिक काटेकोरपणा व परिपूर्णता नव्हती. त्या मानानें डिअरबोर्न व इतर अनेक मनोवैज्ञानिक यांनीं पुढें केलेले प्रयोग अधिक समाधानकारक आहेत. या प्रयोगांत प्रयोज्य व्यक्तींची संख्या पुष्कळ अधिक होती. त्याचप्रमाणें आगंतुक कारणांचा प्रयोगांवर परिणाम होऊन त्याचीं फलितें दूषित होऊं नयेत म्हणून अधिक काळजी घेण्यांत आली होती. या सर्व प्रयोगांचा निष्कर्ष साधारणपणें असा सांगता येईल कीं पाठांतराच्या विषयाचें ज्ञान वाढल्यामुळें व कांहीं स्मृतिसहायक युक्त्या गवसल्यामुळें पाठान्तराला मदत होत असली तरी सतत पाठान्तरामुळें स्मरणशक्ति वाढते असें दिसून येत नाहीं. संस्कृत भाषेचें ज्ञान वाढल्यामुळें संस्कृत श्लोक अधिक लवकर पाठ होतील, पण संस्कृत श्लोकांच्या सतत पाठामुळें स्मरणशक्ति वाढून लॅटिन अधिक लवकर पाठ होईल हें सम्भवत नाहीं. अङ्गुलिमूलांवर असलेल्या उंचवट्यांचा क्रम व एकतीस दिवसांच्या महिन्यांचा क्रम सारखा असल्याचें लक्षांत आल्यामुळें एकतीस दिवसांचे महिने कोणते हें लक्षांत ठेवणें सोपें जाईल, पण यावरून आपली स्मरणशक्ति वाढली असें समजून आतां इतिहासांतल्या तारखाहि आपल्या लवकर लक्षांत राहतील असें कुणाला वाटलें तर तो शुद्ध भ्रम आहे.

स्मरणशक्तीप्रमाणेंच बुद्धिमत्तेचेंहि आहे. सतत अभ्यासामुळें स्मरणशक्ति वाढत नाहीं त्याचप्रमाणें बुद्धिमत्ता देखील वाढत नाहीं. सुशिक्षिताला अशिक्षितापेक्षां ज्ञान अधिक असलें तरी बुद्धिमत्ता अधिक असतेच असें नाहीं, हें सिंहाला जिवन्त करणाऱ्या बुद्धिरहित पण्डिताची गोष्ट लिहिणाऱ्या विचारवन्तानीहि








फार प्राचीन काळींच ओळखलें होतें. तरी ही जाणीव अजून देखील चारदोन मनोवैज्ञानिकांपुरतीच मर्यादित आहे. शिक्षणानें बुद्धिमत्तेचा विकास होतो ही समजूत अजूनहि सार्वत्रिक आहे. म्हणून या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं आधुनिक मनोवेत्त्यांनीं केलेल्या प्रयोगाची माहिती वाचकांना देणें आवश्यक आहे.

थॉर्नडाईकनें सुमारें १३००० विद्यार्थ्यांना एक कसोटी देऊन त्यांच्या बुद्धिमत्तेची नोंद केली. यानंतर एक वर्षभर ते विद्यार्थी गणित, विज्ञान, भाषा वगैरेंचें शिक्षण घेत होते. एक वर्षाच्या या शिक्षणानें त्यांची बुद्धिमत्ता वाढली कीं नाहीं हें तपासून पाहण्यासाठीं त्यानें पुनः त्यांना एक कसोटी दिली. त्यावरून वाढत्या वयामुळें बुद्धिमत्तेंत होणारी वाढ वजा करतां एक वर्षाच्या शिक्षणामुळें बुद्धिमत्तेंत कांहीं लक्षणीय वाढ झाली असें म्हणायला अधार सापडला नाहीं.

एकाच वर्षाच्या शिक्षणानें बुद्धींत वाढ झाली नाहीं तरी आठदहा वर्षांच्या शिक्षणामुळें अशी वाढ होत असल्याचें दिसून आलें आहे असें कांहीं मानसशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. पण ही वाढ बुद्धिमत्तेच्या सर्वच प्रकारच्या कसोट्यांवर आढळून येत नाहीं व ज्या कसोट्यांवर आढळून येते त्यावर देखील ती अत्यल्प व दुर्लक्षणीय असते.

## मन आणि स्नायु

शिक्षणामुळें बुद्धि वा स्मरणशक्ति यांचा विकास होत नाहीं यावरून मन व शरीराचे अवयव यांतला एक महत्त्वाचा फरक स्पष्ट होतो. दण्डबैठका घातल्यानें दण्ड व माण्ड्या पुष्ट व बळकट होतात. रोज दण्डबैठका घालणाऱ्याला फक्त दण्डबैठका घालण्याचेंच कौशल्य साध्य होतें असें नसून कुस्ती, मुष्टियुद्ध वगैरे ज्या ज्या क्रियांमध्यें दण्ड व माण्ड्यांचा उपयोग होतो त्या सर्व क्रियांत तो अधिक कार्यक्षम होतो.

पण मनाचें तसें नाहीं. मनाला शिक्षणाचा 'व्यायाम' दिल्यानें तें अधिक बलिष्ठ होईल ही आशा व्यर्थ आहे. आधुनिक मनोवैज्ञानिक प्रयोगांच्या पूर्वी अशी आशा वाटणें साहजिक होतें. कारण शरीराला जसे हातपाय यासारखे अवयव आहेत तसेच मनाला देखील बुद्धि, स्मरणशक्ति वगैरेसारखे अवयव आहेत व त्यांच्यावर संस्कार केल्यानें ते बलिष्ठ होतात असें मत त्यावेळीं प्रचलित होतें. या मताला Faculty Psychology असें म्हणतात. आज ही Faculty Psychology मागें पडली आहे.

Faculty Psychology मागें पडल्यामुळें शिक्षणाच्या सामर्थ्याबद्दल पूर्वी असलेल्या भरमसाट कल्पना निराधार ठरून सुशिक्षितांना अधिक नम्रता धारण करणें प्राप्त झालें आहे. गणित शिकल्यानें फक्त गणित येतें. इंग्रजी शिकल्यानें फक्त इंग्रजी येतें. आपण गणितांत Ph. D. झालों म्हणून ज्या क्षेत्रांत गणिताचा वापर होत नाहीं त्याहि क्षेत्रांत आपण एखाद्या अशिक्षितापेक्षां अधिक कार्यक्षम ठरूं असें एखाद्या गणितज्ञानें समजणें चूक आहे. आपण इंग्रजी फाडफाड बोलतो म्हणून जेथें इंग्रजीवरील प्रभुत्वाचा सम्बन्ध येत नाहीं अशाहि कामांत एखाद्या खेडुतापेक्षां आपला अधिकार जास्त असें शेक्स्पीअरवर प्रबन्ध लिहिणाऱ्या एखाद्या विद्वानानें समजणें भ्रान्त आहे. आधी शून्यलब्धि व साहित्यशास्त्र यांचीं पुस्तकें पालथीं घालून मग वाणिज्य, राज्यकारभार वा राजकारण यांत शिरणारा मनुष्य त्या भानगडींत न पडतां एकदमच या क्षेत्रांत शिरणाऱ्या अशिक्षितापेक्षां अधिक मोठा व्यापारी वा मुत्सद्दी होईल असें समजायला कांहींच प्रमाण नाहीं.

व्यावहारिक दृष्टीनें याचीं गर्भितें स्पष्ट आहेत. कुणाला काय शिकवावें हें ठरवतांना (१) त्याचा पुढील आयुष्यांत प्रत्यक्ष उपयोग होईल कीं नाहीं (२) त्या विषयांत त्याला गोडी किती आहे व (३) त्या विषयाचे अभ्यासक देशांत असण्याला कांहीं सांस्कृतिक मूल्य आहे कीं नाहीं इत्यादि गोष्टींचा विचार झाला पाहिजे. ज्या विषयाला यापैकीं कोणतेंहि समर्थन लागू नाहीं असा विषय केवळ तो शिकल्यानें "मनोविकास" होतो म्हणून शिकवणें असमर्थनीय आहे. तसेंच एखाद्या कामाला कोणतें शिक्षण आवश्यक आहे हें ठरवतांना त्या शिक्षणानें मिळालेल्या ज्ञानाचा त्या कामांत प्रत्यक्ष उपयोग होतो कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. शिक्षण कोणत्याहि विषयाचें कां असेना त्यानें "मनोविकास" होतो म्हणून कोणत्याहि कामाला तें आवश्यकच आहे ही विचारसरणी आतां टिकण्यासारखी नाहीं.







### वरं बुद्धिर्न सा विद्या

शिक्षणानें मनाचा सर्वांगीण विकास होतो या विचारसरणीप्रमाणेंच शिक्षणानें अन्धश्रद्धा नाहींशा होतात ही समजूतहि मला समर्थनीय वाटत नाहीं. कोणतेंहि मत पुढें आलें कीं त्याला "प्रमाण काय?" हें विचारण्याची व निर्णायक प्रमाण मिळेपर्यन्त त्यावर श्रद्धा न ठेवण्याची वृत्ति शिक्षणानें वाढीस लागते असें दिसत नाहीं. प्रयोगशाळेंत असेपर्यंत प्रत्येक विधानाला काटेकोर प्रायोगिक पुरावा मागणारा वैज्ञानिक देखील प्रयोगशाळेच्या बाहेर आल्या-बरोबर वाटेल त्या भाकडकथांवर विश्वास ठेवायला तयार होतो याची अनेक उदाहरणें प्रत्यहीं दिसतात. मुलें न झाल्यामुळें स्त्रियांच्या स्वास्थ्यावर वाईट परिणाम होतात, प्रार्थना केल्यानें निसर्गाचे व्यापार बदलतां येऊं शकतात वगैरे मतें कोणतेहि प्रयोगसिद्ध आधार न देतां अले-क्सिस कॅरलसारख्या वैज्ञानिकानें उचलून धरलीं आहेत. शरीरशास्त्र व रोगविज्ञान यांत प्रावीण्य संपादन करून देखील पाण्याचें जसें बाष्पशक्तींत रूपान्तर होऊं शकतें तसें कामवासनेचें इतर मनःशक्तींत रूपान्तर होऊं शकतें असें फ्रॉइडनें कोणतींहि विज्ञानपूत प्रमाणें न देतां प्रतिपादन केलें. इतिहासकार म्हणून गाजलेल्या मेकॉ-लेनें साऱ्या संस्कृत वाङ्मयांत मूल्यवान असें कांहींच नाहीं असा विनादिक्कत अभिप्राय देऊन टाकला! आपलें क्षेत्र सोडल्याबरोबर "पुराणांतली वांगी पुराणांत" या न्यायानें विद्वान् शास्त्रीय दृष्टीची कशी रजा घेतात याचीं अशीं उदाहरणें शेंकड्यांनीं मोजतां येतील.

अशा उदाहरणांवरून शास्त्रविचाराची शिस्त ही थोडीफार सैनिक शिस्तीसारखी आहे असें वाटतें. सैन्यांत शिस्तीनें वागणारा सैनिक जीवनाच्या इतर क्षेत्रांतहि शिस्तीनें वागतो असें दिसत नाहीं. उलट नोकरी बजावून झाल्यावर तो अधिकच बेछूट होतो. त्याचप्रमाणें आपल्या व्यवसायांत बुद्धिवादाचें कडक पथ्य पाळावें लागल्यामुळें आपल्या व्यवसायाच्या बाहेर शास्त्रज्ञ मोकाट सुटतो व बुद्धिवादाची ओळख दाख-वणेंही त्याला जड जातें असें म्हणण्याचा मोह अनेक वेळां होतो.

शिक्षणाचा संस्कार झालेल्या मनांत अन्धश्रद्धांचा रिघाव होणें कठिण असतें असें म्हणतां येत नाहीं, एवढेंच नव्हे तर अन्धश्रद्धांचा प्रसार करण्याचें पाप-देखील अनेक वेळां शिक्षणाच्या हातून घडतें. कारण शिक्षण हें बहुधा पुस्तकांचें शिक्षण असतें व एखाद्या पुस्तकांत प्रयोगसिद्ध विज्ञान वा तर्ककर्कश विचारसरणी असली तर हजार पुस्तकांमध्यें मनःपूत गप्पाच असतात. विशेषतः सामाजिक शास्त्रांमध्यें विज्ञानसिद्ध विचारसरणी औषधापुरतीच सापडते. या शास्त्रांवरील अवाढव्य लिखाणापैकीं बराचसा भाग इंडिपसचा गण्ड (Aedipus Complex) आर्यांची भारतावरील स्वारी, विरोधविकासवाद वगैरेसारख्या निराधार कल्पनाजालानें भरलेला असतो. सुशिक्षित माणसाचें मन शास्त्रीय विचारसरणीप्रमाणेंच या कल्पना-जालावर देखील पोसलें जातें. मानवी मनाचा स्वभावच असा आहे कीं ओबडधोबड सत्यापेक्षां अद्‌भूतरम्य कल्पनांचा त्याच्या मनावर अधिक परिणाम होतो. यामुळें शिक्षणाचा परिणाम होऊन एखादें शास्त्रीय सत्य मनावर बिम्बलें तर त्याबरोबर शंभर भाकडकथा देखील मनांत ठाण मांडून बसतात. अडाणी माणसाच्या अंध समजुतींपेक्षां सुशिक्षितांच्या मनांत ठाण मांडून बसलेल्या या भाकडकथा अधिक घातक असतात. कारण अडाणी माणसाला आपण अडाणी आहोत याची जाणीव असते. उलट सुशिक्षिताला आपण भारा-भर पुस्तकें वाचलीं याची इतकी घमेंड असते कीं त्याला सुधारणें अशक्यप्राय होऊन बसतें.

### पढतमूर्खता

सुशिक्षित माणूस अन्धश्रध्दांना बळी पडतो याचें एक कारण शिक्षणानें तत्वाळपणा बळावतो हें आहे. तत्वाळ (doctrinaire) मनुष्य कोणतेंहि विधान खरें की खोटें हें प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारें न ठरवतां कोणत्यातरी पूर्वकल्पित तत्वाच्या आधारें ठरवतो. यासम्बन्धी बेकननें एक मजेदार गोष्ट सांगितली आहे. १५ व्या शतकांत विद्वानांच्या एका सभेंत घोड्याला किती दात असतात हा प्रश्न चर्चेस निघाला. एकाहून एक मोठ्या विद्वानांचीं भाषणें झालीं व त्यांनीं या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं जाड्या जाड्या ग्रंथांचा कीस काढला. पण शेवटीं कांहींच निकाल लागेना. तेव्हां एक पोरसवदा श्रोता उभा राहिला व त्यानें एखाद्या घोड्याचें तोंड उघडून त्याचे दात मोजावे व या प्रश्नाचा निकाल लावावा अशी सूचना केली. त्याबरोबर सर्व विद्वान् त्याच्यावर तुटून पडले व



अनुक्रमणिका






अशी सूक्ष्मपणाची सूचना केल्याबद्दल त्यांनीं त्या पोराला धक्के मारून बाहेर काढून दिलें! शेवटीं प्राचीन ग्रन्थांत पुरेसें प्रमाण नसल्यामुळें हा प्रश्न एक न सुटणारें गूढ आहे असा सर्वानुमतें निर्णय करून त्या विद्वानांची सभा बरखास्त झाली!!

असे निर्बुद्ध निर्णय प्राचीन विद्वान् करीत असतील, पण आधुनिक विद्यांनीं विभूषित झालेले लोक असें करतील हें संभवत नाहीं असें आधुनिकांनीं समजण्याचें कारण नाहीं. अति कायदेपाण्डित्यामुळें न्याय-अन्याया-बद्दलचा साधा विवेक नाहींसा होण्याचा संभव असतो म्हणून न्याय्य निर्णय देण्यासाठीं कायद्याचा गन्धहि नसलेल्या समजुतदार लोकांचें मत घेण्याची जरूरी न्यायाधीशांना कधीकधी वाटते. आर्थिक कारणांनीच सर्व कांहीं घडतें या तत्त्वाची मगरमिठी मनावर बसल्या-मुळें लायसेंकोने पित्याचे गुणधर्म आनुवंशिकतेनें मुलांत उतरतात हें धडधडीत सत्यच नाकारलें. ज्यू वादाच्या आहारीं गेलेल्या रशियावर चढाई केल्याबरोबर "आर्य" रक्ताचे इंग्रज आपल्याशी सख्य करतील या नात्सीवादांतून उद्भवलेल्या दृढ श्रद्धेमुळें हिटलरनें रशियावर चढाई केली व इंग्लंडचा पाडाव करण्याची संधि गमावली.[१] शिवाजी महाराजांचें अवतारकार्य स्वदेश व स्वधर्म यांच्या रक्षणासाठीं घडलें नसून विरोधविकासी साच्यांत बसणारीच ती एक क्रान्ति होती असें सांप्रदायिक वादाची झापड डोळ्यावर बांध-लेले विवेचक म्हणतात. शिवाजी महाराजांच्या कार्याचें रहस्य समजून घ्यायचें असेल तर तत्कालीन ऐतिहासिक साधनांचा अभ्यास केला पाहिजे, विरोधविकास वादाचें तिथें कांहीं प्रयोजन नाहीं. रशियावर चढाई करण्याचे परिणाम काय होतील हें ब्रिटिश मुत्सद्यांचें युद्धोद्देश व बलाबल यांचा अभ्यास करून हिटलरनें ठरवायला पाहिजे होतें, नात्सीवादासारख्या एखाद्या इतिहासो-पपत्तीच्या आधारें तें ठरविणें आत्मघातकीपणाचें होतें. पित्याचे गुणधर्म मुलांत उतरतात की नाहीं हें जनन-शास्त्राच्या आधारें ठरवलें पाहिजे. सर्व मानवी व्यव-हाराच्या मुळाशीं आर्थिक कारणें असतात असें एखादें पूर्वकल्पित तत्त्व येथें अप्रस्तुत आहे. घोड्याला दात किती असतात हे घोड्याच्या तोंडांत पाहून न ठरवतां ग्रंथांत पाहून ठरविणारे प्राचीन विद्वान् व सम्बद्ध पुराव्याचा विचार न करतां पूर्वकल्पित तत्त्वांच्या आधारें महत्त्वाच्या विषयांवर मतें बनविणारे वरील आधुनिक विद्वान् यांच्या मनोवृत्ति एकाच जातीच्या आहेत.

१. हिटलरच्या वर्तनाची अशी उपपत्ति अनेक पाहतां ती खरी असावी असें वाटतें.

## दोन भाषा आणि दोन घोडे

अन्धश्रद्धांच्या विरुद्ध शिक्षणाची तटबन्दी उपयोगी पडत नाहीं. व शिक्षणाने बुद्धिमत्तेची वाढ होत नाहीं ही परिस्थिति निराशाजनक तर खरीच पण यापेक्षाहि अधिक निराशाजनक गोष्ट म्हणजे कांहीं प्रकारच्या शिक्षणानें बुद्धिमत्तेवर विपरीत परिणाम होण्याचा देखील सम्भव असतो. एकापेक्षां अधिक भाषांवर प्रभुत्व मिळवण्याचा प्रयत्न केल्यानें बुद्धीवर फाजील ताण पडून ती बोथट होऊं लागते असें कांहीं मनो-वैज्ञानिकांचें मत आहे. वेल्समध्यें इंग्रजी व वेल्श या दोन्ही भाषांत प्रावीण्य मिळवलेल्या विद्यार्थ्यांची बुद्धि-मत्ता व केवळ वेल्श शिकलेल्या विद्यार्थ्यांची बुद्धिमत्ता यांची सार या वैज्ञानिकानें तुलना केली तेव्हां केवळ वेल्श शिकलेले विद्यार्थी फारच सरस आढळून आले. या एकभाषी विद्यार्थ्यांनीं नवव्या वर्षी जेवढें शब्दज्ञान सम्पादित केलें होतें तेवढें दोन भाषा बोलणाऱ्या विद्या-र्थ्यांना अकराव्या वर्षापर्यन्त देखील झालें नव्हतें. एक-भाषी विद्यार्थ्यांच्या विचारपद्धतींत सुस्पष्टता व अचूक-पणा देखील अधिक होता.

क्रिस्टोफर्सन या मनोवैज्ञानिकानें साऱ्या वरील विधानांना पुष्टि दिली आहे. दोन भाषा वापरणें हें दोन धोतरें वापरण्यासारखें सोपें नाहीं. दोन घोड्यावर एकदमच स्वारी करण्यासारखें दुर्घट आहे. दोन भाषा म्हणजे भावभावनांचीं दोन जगेंच असतात. सतत एकांतून दुसऱ्यांत फेरफटका करण्याची कसरत बुद्धीला सहजासहजी झेपत नाहीं.

बहुभाषिकत्वामुळें होणारे हे दुष्परिणाम संस्कृत-मराठी सारख्या आईलेकीप्रमाणें जवळच्या भाषांच्या बाबतींत दिसून येत नाहींत. उलट संस्कृतच्या अभ्यासामुळें मराठीचें ज्ञान जास्त अचूक व अढळच होतें. शब्द, वाक्प्रयोग, व्याकरण इत्यादिकांत सर्वस्वी भिन्न अस-लेल्या भाषांच्या बाबतींतच बहुभाषित्वाचे दुष्परिणाम जाणकार लोक लावतात व त्याचें आत्मचरित्र वाचून








मोठ्या प्रमाणावर दिसून येतात. कारण अशा भाषा शिकतांना एका भाषेचें ज्ञान दुसऱ्या भाषेच्या आड येतें. दुसऱ्या भाषेंत विचार व्यक्तवितांना पहिल्या भाषेंतले शब्द व वाक्प्रयोग आठवतात. त्यांना डावलून दुसऱ्या भाषेंतलेच शब्द व वाक्प्रयोग नेमके आठवणें कठिण होऊन बसतें. ज्याला पहिली भाषा येतच नाहीं त्याला हा द्राविडी प्राणायाम करावा लागत नाहीं. हिंदुस्थानांत मोटर हाकायला शिकलेला माणूस अमेरिकेंत मोटर हाकतांना अधिक अपघात करायचा सम्भव असतो; कारण हिंदुस्थानांत त्याला डावीकडून जाण्याची संवय झालेली असते, उलट अमेरिकेतील रहदारीच्या नियमा-प्रमाणें उजवीकडून जाणें आवश्यक असतें. जो डावी-कडून जायला कधी शिकलाच नाहीं त्याला उजवीकडून जाण्याची संवय लवकर लागेल, त्याचप्रमाणें जो इंग्रजी शिकलाच नाहीं त्याला मराठी अधिक सहजतेनें येईल हें स्पष्ट आहे.

## हा भार अनावश्यक आहे

तेव्हां शिक्षणक्रमांत कोणत्याहि भाषेचा अन्तर्भाव करतांना सर्वस्वी भिन्न असलेल्या भाषांवर प्रभुत्व मिळवण्याची धडपड विद्यार्थ्यांना करावी लागणार नाहीं याची काळजी घेतली पाहिजे. सर्वस्वी भिन्न असलेल्या अनेक भाषा शिकणें कांहीं विषयांत व व्यवसायांत आवश्यकच असतें. पण अनेक भाषांवर सारखेंच प्रभुत्व असणें बहुधा आवश्यक नसतें. जन्मभर संस्कृत भाषेचें अध्ययन करणाऱ्या बहुतेक पाश्चात्य पण्डितांना संस्कृतमध्यें बोलतां वा लिहितां येत नाहीं. संस्कृत भाषा व वाङ्मय यासंबंधीची त्यांची विद्वत्ता त्यांच्या स्वतःच्या भाषेतूनच प्रकट होते. संस्कृत पंडित म्हणवणाऱ्यांना देखील संस्कृतमध्यें विचार व्यक्तवितां येणें आवश्यक वाटत नाहीं. यावरून ज्या ज्या भाषा शिकणें आपल्याला प्राप्त आहे त्या सर्वांत विचार व्यक्तविण्याचें सामर्थ्य देखील आपल्याला असलेंच पाहिजे असें नाहीं हें स्पष्ट होतें. ज्यांना अनेक भाषा शिकाव्याच लागतात त्यांनीं देखील विचार व्यक्तविण्या-साठीं कोणतीतरी एकच भाषा वापरावी व बाकीच्या भाषांचें केवळ समजण्यापुरतें ज्ञान संपादन करावें. असें धोरण ठेवल्यानें बुद्धीवरचा ताण बराच कमी होऊन भाषाशिक्षणांत व्यर्थ ख़र्च होणारा बराच वेळ व श्रम वाचूं शकेल.

ही बचत किती मोठी राहील याची कल्पना करतां येणें शक्य आहे. एखादा शब्द दुसऱ्यानें वापरला असतां, समजणें व योग्य संदर्भांत तो स्वतः वापरतां येणें यांत पुष्कळ फरक आहे. पहिल्या क्रियेला त्या शब्दाचा अभ्यास फक्त ओळख पटण्याइतका झाला असला तरी पुरतें, उलट दुसऱ्या क्रियेला तो शब्द स्वतः होऊन आठवण्याइतका त्याचा अभ्यास होणें आवश्यक असतें. स्मरणशक्तीच्या पहिल्या अवस्थेला प्रत्यभिज्ञा व दुसरीला उपस्थिति असें म्हणतात. एखाद्या विषयाची प्रत्यभिज्ञा व्हायला त्याचा किती अभ्यास करावा लागतो व उपस्थिति यायला किती अभ्यास करावा लागतो हें ठरवण्यासाठीं मनोवैज्ञिकांनीं कांहीं प्रयोग केले आहेत त्यावरून प्रत्यभिज्ञा व उपस्थिति यांत जमीनअस्मानाचें अन्तर आहे हें स्पष्ट होतें.

लू नें कांहीं लोकांना बारा शब्द पाठ करायला लावले. शब्द पूर्णपणें पाठ झाल्यावर दोन दिवसांनीं त्यापैकीं किती शब्द लक्षांत आहेत हें पाहण्यासाठीं त्यांची दोन प्रकारें चांचणी घेतली. एकदा पाठ केलेले सगळे शब्द लिहायला सांगितले तर एकदा स्वतःच लिहिलेले अनेक शब्द दाखवून त्यापैकीं पाठ केलेले कोणते हें ओळखायला सांगितलें. पहिल्या चांचणींत प्रयोग्य व्यक्तींना फक्त ४० टक्के शब्द लिहितां आले. उलट दुसऱ्या चांचणींत त्यांनीं ७९ टक्के शब्द ओळखले. अशाच दुसऱ्या एका प्रयोगांत उपस्थिति फक्त २७ टक्के तर प्रत्यभिज्ञा ७२ टक्के यशस्वी झाल्याचें आढळून आलें. तसेंच शब्दांची प्रत्यभिज्ञा साध्य व्हायला जेवढा वेळ लागतो त्याच्या दुप्पट वेळ त्यांची उपस्थिति साध्य व्हायला लागतो असेंहि या प्रयोगांवरून म्हणतां येतें.

या प्रयोगांत जी उपस्थिति तपासण्यांत आली तिच्या मार्गांत कांहीं अडथळे नव्हते. पण भाषा बोलतांना जी उपस्थिति लागते तिच्यांत दुसऱ्या भाषेच्या ज्ञानाचा मोठा अडथळा असतो. अशा अडथळ्याच्या उपस्थितीची जर प्रत्यभिज्ञेशीं तुलना केली तर तिला प्रत्यभिज्ञेच्या दुप्पटच नव्हे तर तिप्पट देखील वेळ लागण्याचा सम्भव आहे. तेव्हां भाषेंत अनायास विचार व्यक्तविण्याचें सामर्थ्य येण्यासाठीं ती भाषा नुसती समजूं लागायला जेवढा अभ्यास आवश्यक आहे त्याच्या तिप्पट तरी अभ्यास करावा लागेल असें म्हणणें निरा-धार होणार नाहीं.

श्री. रा. वि. अधिकारी

# माणगांव तालुक्यांतील गांवांचीं नांवें :४:

## विविध भाषांचा ठसा

या नांवांकडे भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तर संस्कृत, प्राकृतमहाराष्ट्री, मराठमोळी, गोमांतकीय, यावनी, कानडी, वगैरे अनेक भाषांचे संस्कार झालेले आढळून येतात. कारण या प्रदेशावर निरनिराळ्या काळांत निरनिराळ्या लोकांची सत्ता होती. आणि त्या सत्ताधाऱ्यांच्या आणि त्यांच्या अधिकाऱ्यांची भाषेची छाप येथील लोकजीवनावर उठणें अपरिहार्यच होतें. विजापूरची आदिलशाही, दिल्लीकर मोंगलांची बादशाही, यांची यावनी भाषा तर विजयानगरच्या कानडी राज्यामुळें त्या भाषेचा प्रभाव पडणें अगदीं स्वाभाविकच आहे. आणि त्याप्रमाणें तो पडल्याचें दिसूनहि येतें. पण इंग्रजांचें राज्य या देशावर दीडशे वर्षें होतें पण त्यांच्या भाषेचे संस्कार मात्र झालेले मुळीच दिसत नाहींत. कारण आपली संस्कृति बळजबरीनें लादण्याचा हडेलहप्पी प्रयत्न त्यांनीं कधींच केला नाहीं हें होय.

मुसलमानी संपर्कानें सुद्धां या तालुक्यांत तीनच गांवांच्या नांवांत आपला प्रभाव ओतला आहे. आणि त्यांत सुद्धां एकच गांव (फलाणी) हा शुद्ध यावनी शब्द असून बाकी पूर्वपद यावनी तर उत्तरपद मराठी असला गंगाजमनी प्रकार त्यांत दिसतो. विजयानगरच्या राज्यामुळें कानडी भाषा गांवांच्या नांवांत दिसावी हेंहि साहजिकच आहे. पण गोमांतकीय भाषेचे संस्कार येथील ग्रामनामांत दिसून यावे याचें मात्र नवल वाटतें. या भागावर केव्हांतरी गोमांतकीय सत्ताधाऱ्यांचा अंमल होता की काय अशी शंका येते. या तालुक्यांतील प्राचीन राज्य उंबर्डी येथेंहि जुन्या काळापासून सारस्वत लोकांची मोठी वस्ती होती. हे सारस्वत लोक मूळ गोव्याचेच. त्यांच्यामुळें हा प्रभाव पडला असण्याचाहि संभव आहे. आणि विशेष म्हणजे उंबर्डी हें गांव ज्या निजामपूर भागांत आहे त्याच भागांत हे संस्कार दिसून येतात.

## ग्रामत्वबोधक पद न लागलेलीं गांवें

गांवांच्या नांवांतील ग्रामत्ववाचक पदांचा आत विचार करूं. कारण त्याशिवाय या विवेचनाला पूर्णत्व येणार नाहीं. प्रथम ही गोष्ट लक्षांत येते कीं कोणतेंहि ग्रामत्वबोधक पद न लागतां झालेल्या गांवांची संख्या साठ आहे. म्हणजे सुमारें ⅛ गांवें केवळ आद्यपदानें अथवा त्याचें अंत्याक्षर एकारांत वा ईकारांत होऊन झालीं आहेत. पण यांत कांहीं नांवें पदयुक्त निघण्याचाहि संभव आहे. उदाहरणार्थ, साजे हें गांव मी पदरहित म्हणून ठरविलें आहे पण अशीहि एक जबरदस्त शंका आहे कीं सा या एकाक्षरी शब्दाला कांहींतरी अर्थ असावा. कारण अलीबाग तालुक्यांत सागांव या नांवाचें एक गांव आहे. तर महाड तालुक्यांत सापे या नांवाचें आणि कर्जत तालुक्यांत सापेले या नांवांचें गांव आहे. हीं गांवांचीं नांवें सा शब्दाला गांव, पे, आणि पेले (अशीं दोन) अशीं पदें लागून तयार झालीं आहेत. तेव्हां जर साचा अर्थ कळून त्या गांवांच्या नांवांवर वेगळा प्रकाश पडला तर साजे, साले वगैरे गांवांच्या नांवांतील अंत्य अक्षर पद ठरेल व पदयुक्त गांवांत त्यांचा समावेश होईल. तसेंच कविलवहाळ मधील वहाळ, कोळविऱ्यांतील विरा हे निसर्गबोधक म्हणून त्यांची पदरहित गांवांत गणना केली आहे. पण त्या शब्दांना ग्रामवाचकत्व प्राप्त झाल्याचें आढळलें तर तींहि नांवें या वर्गांतून गळण्याचा संभव आहे.

## ग्रामत्वबोधक पदांचा विचार

पदें लागून एकशे शहात्तर गांवांचीं नांवें बनलीं आहेत आणि त्यांत एकंदर अठ्ठावन्न पदें वापरलीं गेलीं आहेत. त्यांत वली हें पद लागून झालेलीं गांवें सर्वांत अधिक म्हणजे तेवीस आहेत. वली हें पद पल्ली या शब्दापासून तयार झालें आहे. कारण प चा व नेहमीच झालेला आढळून येतो. जसें दीप याचें दिवा, तप्—तापणें पासून तवा वगैरे. हा पल्ली शब्द खेडे-








गांव या अर्थाचा आहे. हा शब्द संस्कृत भाषेंत सांपडतो पण अमरकोशांत मात्र तो मिळत नाहीं. यावरून असें वाटतें कीं तो दाक्षिणात्य भाषेंतील शब्द संस्कृत भाषेंत मागून दाक्षिणात्य संस्कृतीशी संघटन वाढल्यावर घेतला गेला असावा. कानडी, तेलगू, तामीळ या सर्व भाषांत हा शब्द आढळतो. तामीळ भाषेंत या शब्दाचा अर्थ खेडेगांव असून शिवाय ओळहि आहे. म्हणजे आपल्या संस्कृत आवलीशी त्याचें साम्य आहे. पण आवलीशी साम्य आहे तरीहि हा शब्द दाक्षिणात्य भाषेंतील पल्ली शब्दावरून आला असें म्हणतो. कारण संस्कृत भाषेचा प्रभाव येथील संस्कृतीवर बऱ्याच उशिरानें पडला असावा असा माझा समज आहे. संस्कृतसारखी भाषा पेलण्याचें सामर्थ्य येथील सुरवातीच्या सत्ताधारी वर्गाजवळ होतें वा सामान्य लोकांत होतें असा तर्क करवत नाहीं.

या वलीच्याच अर्थाचीं व लोकव्यवहारांत विकृत उच्चार होऊन थोडा फरक पडलेलींहि कांहीं पदें आहेत. त्यांचा सर्वांचा एक वर्ग कल्पावयाला हरकत दिसत नाहीं. ओली, ओल, एली व वळ हीं पदें अशीं आहेत. हीं पदें लागून झालेल्या गांवांची संख्या अनुक्रमें सात व बाकीच्यांची एकएक आहे. शिवाय पोली, पाले, हीं पदेंहि पल्ली वा वली वरूनच झालेलीं उघड दिसत असल्यामुळें तींहि त्याच वर्गांत घालावयास हरकत नाहीं. हीं पदें लागून अनुक्रमें एक आणि चार गांवांचीं नांवें तयार झालीं आहेत. म्हणजे या वर्गांतील सात पदांनीं अडतीस ग्रामनामें तयार झालीं आहेत.

गांव हें ग्रामत्वबोधक पद लागून १८ गांवांचीं नांवें तयार झालीं आहेत. कृषि संस्कृतीच्या स्वीकारानंतरच हीं गांव हें पद लागून झालेलीं गांवें बनलेलीं असावींत असा माझा समज आहे. ग्राम या संस्कृत शब्दावरून गांव हा शब्द झाला आहे म्हणजे संस्कृतभाषेच्या संपर्कानंतरच या गांवाचें अस्तित्व घडलें असलें पाहिजे. घर हें पद लागून झालेलीं अकरा ग्रामनामें आहेत आणि ले, ळे, ळी, ळ, आणि ल हीं पदेंहि याच अर्थाचीं आहेत असें म्हटलें पाहिजे. कारण कृषि संस्कृतिपूर्वी गोपाल संस्कृतीचे लोक आपल्या गुरांच्या चराईला अनुकूल अशी मोकळी भूमी पाहून झोपडें बांधून राहूं लागले असतील. असल्या एखाद्या घराची वस्ती घर अथवा त्याच अर्थाचा जो आलय हा शब्द त्यावरूनच हीं बाकीचीं पदें बनलीं आहेत असें दिसून येतें. कारण त्यांत उच्चारसाम्याबरोबर उच्चार सौकर्यहि आहे. म्हणून या सर्वांचा एक वर्ग केला तरी चालण्या-सारखें आहे. या इतर पदांनीं पुढीलप्रमाणें ग्रामनामें बनलीं आहेत. ले चीं सहा, ळेचीं पांच, ळीचीं दोन, ळचीं दोन आणि लचें एक म्हणजे या वर्गांत एकंदर सत्तावीस ग्रामनामें येतात.

शेत हें ग्रामत्वदर्शक पद लागून दहा ग्रामनामें तयार झालीं आहेत. यांतील शेत हा शब्द कृषिवाचक आहे कीं निर्वाह क्षेत्र दाखविणारा आहे हें सांगणें कठीण आहे.

णे हें पद लागून सहा ग्रामनामें तयार झालीं आहेत. णे हें पद नेर म्हणजे गांव या शब्दावरून तयार झालें असावें. नेरमधील र केव्हांतरी गळून गेला असणें अशक्य नाहीं. हें नेर पद लागून झालेलीं बरींच नांवें सर्वत्र आढळतात. अमळनेर, जामनेर, जुन्नर वगैरे यांचीं उदाहरणें प्रसिद्ध आहेत. हिंदी भाषेंतहि हा शब्द शहर या अर्थानें आहे. या नेर पदाचें णेर असें रूप होऊन मग तें लागून झालेलें एकच गांव या तालुक्यांत आहे.

वणे हें पद लागून झालेलें एक गांव आहे तर वण हें पद लागून तयार झालेलीं चार ग्रामनामें आहेत. पहिलें वणे णे पासूनच झालें असावें असा तर्क आहे तर वण हें वन यावरूनच झालें असलें पाहिजे असें वाटतें. कारण कोंकणचा भूविभाग समुद्रांतून मागाहून निर्माण झालेला आहे. तेथें प्रथम दाट जंगलें असणें व त्यांत वस्ती झाली असणेंच शक्य आहे. यामुळें ते विभाग त्या वनांच्या नांवानें ओळखले जात होते, त्याच नांवानें ते वस्ती झाल्यावरहि ओळखले जात राहणें अशक्य नाहीं.

पूर हें पद लागून झालेलीं फक्त तीनच ग्रामनामें आहेत. पण त्याच अर्थाचा प्राकृत महाराष्ट्री शब्द ऊर आणि त्याचाच अपभ्रंश होऊन झालेलीं अेरे, उरे आणि एरे हीं पदें लागून अनुक्रमें दोन, तीन आणि एकेक गांवें आहेत म्हणजे या वर्गांत एकंदर दहा ग्रामनामें झालीं.

ओशी, ओसे, ऊस, शी आणि सई या ग्रामत्व-बोधक पदांचा एकच गट करावयास हरकत नाहीं. कारण वास म्हणजे राहणें या एकाच अर्थाचें ती सर्व पदें



अनुक्रमणिका






दर्शन घडवीत आहेत. सई हें पद पाहतांच गांवसई म्हणजे सर्व गांवगांवकी– या शब्दाची आठवण येते. सई हा वस्ती म्हणजेच गांव या अर्थाचा शब्द धरला तर गांवाच्या पुढें तो शब्द लागणें म्हणजे सह्याद्रि पर्वत असें म्हणण्यांतलाच प्रकार आहे. पण तो आहे खरा. या पदांनीं अनुक्रमें तीन, दोन, एक, तीन, आणि तीन अशी ग्रामनामें झालीं असून या गटांत एकंदर बारा ग्रामनामें आहेत.

आट, आटे, आठे, टे, टी, आड, डे आणि डी या पदांचा एक वर्ग करावयास कांहीं हरकत येईलसें वाटत नाहीं. कारण ट आणि ड यांच्यांत उच्चारसाम्य कमालीचें आहे. या पदांनीं झालेलीं ग्रामनामें अनुक्रमें तीन, एक, एक, दोन, एक, सहा, तीन आणि दोन अशीं एकूण एकोणीस आहेत. पण हा वर्ग अर्थाच्या दृष्टीनें भानगडीचा आहे. कुठें हें पद म्हणजे डोंगर पायथ्याची सपाट जागा, चौरस जागा या अर्थानें आला असेल तर कोठें पाण्याच्या आडाचें सामीप्य दाखवील तर कोठें हाट म्हणजे बाजार दाखवील असा बहुरूपीपणा त्यांत आहे ( महाड या गांवांतील आड, हाट म्हणजे बाजार या अर्थानें आला आहे हें उघडच आहे ) तर कोठें या पदाचा अर्थहि प्रकट करीत असण्याचा संभव आहे.

या नंतर पे, प, व, वी, वे, बे, या पदांचा एक गट येतो. या पदांनीं अनुक्रमें तीन, एक, तीन एक एक आणि एक अशीं एकंदर दहा ग्रामनामें तयार झालीं आहेत. या पदांना हा ग्रामत्वबोधकपणा कसा प्राप्त झाला हें सांगणें कठीण आहे. पण मला वाटतें कांहीं पदें अशीं असतात कीं खुद्द त्यांना कांहीं अर्थ नसतो; परंतु तीं दुसऱ्या शब्दापुढें आली कीं अमुक अमुक तऱ्हेचें गांव असा त्याचा अर्थ होतो या वर्गांतीलच हीं पदें असावीत.

जे आणि ज या पदांनीं तीन व एक अशीं चार ग्रामनामें तयार झालीं आहेत. हीं पदें ग्रामत्ववाचक कशीं झालीं हें सांगणें कठीण आहे. पण या पदांनीं झालेलीं गांवांचीं नांवें मात्र पुष्कळच आढळतात. भार्जे, भाजे, बोरज, मिरज वगैरे गांवें प्रसिद्धच आहेत. पण स आणि ज यांतील उच्चार साम्य लक्षांत घेतलें तर सईवरूनच हीं पदें तयार झालीं असावीं अशी शंका येते. आणि मात्रा ( एकार ) तर पुष्कळदा लोप पावते. आपण नेहमी बोलतांना असेंच्या ऐवजी असं म्हणतो. त्यानेंच्या ऐवजी त्यानं म्हणतो.

स्ते आणि ते हीं पदें लागून अनुक्रमें दोन व एक ग्रामनामें झालीं आहेत. ही स्था या धातूपासून झालीं असल्यामुळें ग्रामदर्शक झालीं आहेत.

खोल हें पद कानडी कोळ्ळ या शब्दावरून झालें असावें असें वाटतें. उजेखोल गांवावरील विवेचनांत त्याचा अर्थ दिला आहे. हें पद लागून दोन ग्रामनामें झालीं आहेत.

वडे, वंडी, वाडी आणि ओंडा हीं पदें लागून अनुक्रमें दोन, एक, एक व एक अशीं एकूण पांच ग्रामनामें झालीं आहेत. हें मराठी पद असून तीं वाडी व तिचा अपभ्रंश यांनीं झालेलीं आहेत.

ठणे हें पद लागून एकच गांव झालें आहे. हें पद स्थान या शब्दावरून झालेलें आहे. हें पद लागून झालेलें गांव नागोठणें. दरे हें पद लागून एकच ग्रामनाम झालें आहे. वास्तविक हें ग्रामत्ववाचक पद नसून दरी हा अर्थ सांगणारे निसर्गदृश्यसूचक पद आहे. पण इतर ठिकाणी त्याचा ग्रामत्वदर्शक उपयोग झाल्याचें दिसून येतें. म्हसळे महालांत पणदरे आणि सणदेरी, मंडणगड तालुक्यांत पणदेरी तर कर्जत जवळचें रेल्वेस्टेशन पळस-दरी हीं याचीं उदाहरणें आहेत. यामुळें त्याचा समावेश पदांत केला आहे.

अंग, ऊण आणि गण हीं पदें लागून प्रत्येकीं एकेक ग्रामनाम बनलें आहे. हीं पदें आहेत कीं नाहीं याबद्दल मी साशंकच आहे. त्यांतून काय अर्थ निघतो हें कळत नाहीं. पण आहेत तीं दाखविलीं आहेत एवढेंच.

क आणि द यादोन्ही पदांनीं प्रत्येकी एकेक ग्राम-नाम तयार झालें आहे. यांतील द हें पद कानडी आहे. त्या भाषेंतहि द शब्दाला स्वतंत्र अर्थ नाहीं पण दुसऱ्या शब्दाला लागून आल्यावर गांव असा त्याचा अर्थ होतो. व कच्या बाबतींत कांहीं लिहितां येत नाही कारण मलाच त्याचा उलगडा झालेला नाहीं.

दोन दोन पदें लागून झालेलीं तीन ग्रामनामें या तालुक्यांत आहेत. १. गोवेले, दुसरें घरोशी आणि तिसरें नगरोली. घाटांतून गाडी वर चढवतांना तिला दोन इंजिनें जोडावीं लागतात त्याप्रमाणे अर्थव्यक्तीचा घाट चढून जाण्यासाठीं दोन पदें लागण्याची जरूर कां वाटली हें सांगणें कठीण आहे. आणि त्यांत गोवेले या

पूर्वपद शब्दांत वे आणि ले हीं दोन पदें आलीं खरी पण नें गो तें तरी कायम राहिलें आहे. पण घरोशी आणि नगरोली यांच्यांत तर तें त्रेपत्ताच झालें आहे. गोवे म्हणून जो अर्थ लक्षांत येतो तोच गोवेले या शब्दांनेहि येतो. अर्थ लक्षांत येतो. पण या दुसऱ्या दोन गांवांच्या नांवांतील प्रकार मात्र अजब आहे. हा प्रकार पाहून मला एक घटना स्मरली. मी एकदां चेंबूरला गेलो असतां मला एक परिचित बाई भेटल्या. त्यांना मी त्यांचें बिऱ्हाड कोठें आहे असें विचारलें. त्या म्हणाल्या, बागेजवळ; तेव्हां मी पुन्हां प्रश्न केला कोणत्या बागेजवळ ? तेव्हां त्यांनीं सांगितलें गार्डन बागेजवळ म्हणजे बाग आणि गार्डन हे एकाच अर्थाचे दोन्ही शब्द वापरून त्यांनीं बागेचें नांव मात्र सांगितलें नाहीं. तोच प्रकार घरोशी आणि नगरोली या गांवांबाबत झाला आहे.

या तालुक्यांत नगर, आवती वगैरे पदांनीं आलंकृत एकहि गांव झालेलें नाहीं कारण एकहि मोठें शहर या तालुक्यांत नव्हतेंच. नामकरण करणारांच्या मनांत काय होतें हें कळावयास कांहींच मार्ग नाहीं कारण त्याबद्दल कांहींच लिहून ठेवलेलें नाहीं. केवळ तर्काचें घोडें दौडवूनच आपलें इष्ट गांठावयाचें आहे. त्या दृष्टीनें यथामति प्रयत्न करण्याची शिकस्त केली आहे. या नांवांतून प्राचीन भोज संस्कृति, गोपाळ संस्कृति, कृषिसंस्कृति, सुसंस्कृतांची जनमनावर पडलेली छाप, सार्थवाहकांच्या बैलांच्या टापांनीं झालेल्या खुणा, चांचे आणि चोर यांच्या साहसांचें चित्तथरारक दर्शन या नांवांतून होत आहे. कानडी, मराठी, संस्कृत, प्राकृत महाराष्ट्री यांचे संस्कार, यावनी भाषेचे पडसाद यांतून ऐकावयास येत आहेत. आणि जीवनाची विविधता, विशालता आणि वैचित्र्य, मनुष्येतर सृष्टीजवळ जुळलेले निकट संबंध, निसर्गाशी झालेली मैत्री सर्वांचें मनोज्ञ दर्शन यांतून होतें. आणि तें अत्यंत उद्बोधक आणि भव्य व मनोरंजक असल्याचाहि प्रत्यय येतो.

यांतून कांहीं इतिहास विषयक अनुमानें निघूं शकतील हें खरें पण त्याकरितां इतिहासशास्त्राचा अभ्यास केलेल्या विद्वानाची आवश्यकता आहे. तें काम माझ्यासारख्या अनभ्यस्ताचें नव्हे. शिक्षणाच्या दृष्टीनें माझी लायकी शून्य आहे. महाविद्यालयीन वा दुय्यम शिक्षण तर राहूंद्याच ! पण प्राथमिक शिक्षणहि पुरें झालेलें नाहीं. अशा ( ना ) लायकीच्या मनुष्यानें या फंदांतच पडावयास नको होतें. पण गेलीं कित्येक वर्षे मन या विषयाकडे ओढ घेत होतें. यामुळें अखेरीस गंगेची हिमालयापासून पूर्वसागरापर्यंत पूर्ण प्रदक्षिणा करतां येत नाहीं. म्हणून गंगेचें पाणी तांब्यानें घेऊन कां होईना आंगावर ओतून स्नान करण्यांत कमी पुण्य असेल पण पाप खास नाहीं या विचारानें प्रेरित होऊन या धाडसाला प्रवृत्त झालों. आणि शक्य तेवढें निरीक्षण आणि चिंतन करून, सर्व बाजूंनीं विचार करून जें सुचलें आणि त्यांतील जेवढें व्यक्त करतां आलें, तेवढें लिपिबद्ध केलें आहे.

माणगांव तालुक्यांतील गांवांपुरतेंच क्षेत्र मर्यादित करून घेतलें होतें. कांहीं गांवांना असणाऱ्या वाड्यांच्या उपगांवांच्या नांवांचा या लेखांत विचार केला नाहीं. पण तीहि चिंतन करण्याजोगा विषय आहे. मुळगांव, नवघर, धुमकोळी, घोडेबुम, कोरकंडे, विठ्ठलवाडी, चिकणी, भिनाड, म्हैसवाडी वगैरे वाड्यांचीं नांवें पाहून व एकंदर परिस्थितीचा विचार करता अशी कल्पना होते कीं कांहीं गांवें निरनिराळ्या गांवांचें संयोगीकरण होऊन तर कांहीं गांवें एका गांवाचें विभक्तिकरण होऊन बनलीं असावीं. कोठें अशीं गांवें अमुक, गांवाचा कोंड, तमुकगांवची वाडी म्हणून ओळखलीं जातात तर कोठें त्यांना वेगळी नांवें मिळून तीं कागदोपत्रीं एक असलीं तरी लोकव्यवहारांत तीं वेगळीं गांवें म्हणूनच वागवलीं जातात या नांवाचाहि अभ्यास होणें जरूरीचें आहे. असो आपल्या सहनशक्तीला तुटेपर्यंत न ताणतां हा लेख संपवितों.

---



अनुक्रमणिका








श्री. ल. द. वेंबळकर

# भवभूतिसंबंधीं कांहीं नवीन माहिती

संस्कृत वाङ्मयांत भवभूतीचें स्थान कालिदासांच्या बरोबरीचें समजलें जातें. या कवीवर प्रो. काणे, प्रो. बेलवलकर, प्रो. हर्षे, प्रो. तोडरमल्ल, इत्यादिकांनीं आजपर्यंत अधिकारी वाणीनें लिहून ठेवलेलें आहे. प्रो. भांडारकर आणि प्रो. मिराशी यांचेंहि बहुमोल संशोधन उपयुक्त ठरलेलें आहे. पण त्या सर्वांच्याहि कक्षेंतून निसटलेल्या आणखी कांहीं नवीन गोष्टी नमूद करणें अभ्यासकांच्या जिज्ञासापूर्तीसाठीं लिहिणें आवश्यक आहे. म्हणून हा प्रयत्न मी करीत आहें.

भवभूतीनें तीन नाटकें लिहिलेलीं उपलब्ध आहेत. कांहीं स्फुट काव्यें कवितासंग्रहांतून आढळतात, त्यावरून त्याची आणखी कांहीं रचना असावी, असें अनुमान करणें बरोबर वाटतें. पण निश्चित पुरावा अद्यापि मिळाला नाहीं.

## भवभूतीची मूळची माहिती

या त्याच्या तीन नाटकांच्या प्रस्तावनांतून त्या कवीनें आपली स्वतःची बरीच हकीकत लिहिलेली आहे. कवीचें नांव श्रीकंठ असून भवभूति या नांवानें तो ओळखला जात असे. तो दक्षिणेकडील पद्मपूरचा रहिवासी. त्याचें ब्राह्मणकुल वाजपेय यज्ञ करणारें आणि पंक्तिपावन होतें. त्याचें गोत्रनाम उदुंबर होतें. वडिलांचें नांव नीलकंठ, आजोबांचें नांव भट्ट गोपाल, आणि आईचें नांव जातुकर्णि असें होतें. त्यानें आपलीं नाटकें कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगीं करून दाखविलीं.

## श्रीकंठ

यांतील प्रत्येक पद विचारणीय आहे. त्यांतील नांवासंबंधी प्रथम विचार करूं—

श्रीकंठ हें त्याचें पितृकृत नांव. श्री. S. K. De असें म्हणतात कीं तें त्याचें टोपणनांव होतें. किंवा श्रीकंठ हें एका देशाचें नांव, त्या देशाचें भूषण असणारा. पण हा अर्थ समंजसपणाचा वाटत नाहीं. कारण श्रीकंठ हा देश बाणानें सांगितल्याप्रमाणें स्थानेश्वरच्या आसपासचा म्हणजे उत्तर हिंदुस्थानांत आहे. आणि कवि स्वतः सांगत आहे कीं दक्षिणापथांतील पद्मपुर हें माझें गांव.

दक्षिणापथ म्हणजे कोणता भाग तेंहि या ठिकाणीं पाहणें युक्त आहे. ‘शरावत्याः दक्षिणे भागे,’ असें कांहीं टीकाकार सांगतात. राजशेखर places दक्षिणापथ to the South of माहिष्मती. Countries situated in it are महाराष्ट्र, महिष्क, अश्मक, विदर्भ, कुंतल, क्रथकैशिक, शूर्पारक, कांची, केरळ, कावेर, मुरल, वनवासक ...... नासिक्य, कौंकण, कोलगिरि, इ. It included the महेंद्र पर्वत. वैजयंती नांवाचा एक कोश आहे. त्यांतील देशाध्यायांत सांगितलें आहे. दक्षिणापथ is the name of the country to the South of the विंध्य पर्वत.

– Indian His. Quart. 1943

तेव्हां या दक्षिणापथांतून तो उत्तर प्रांतांत गेला, तेथेंच स्थायिक झाला, आणि तो प्रसिद्धि पावला, हें बरोबर असलें, तरी पण तो श्रीकंठ देशांत स्थिर झाला नाहीं, हेंहि खरें आहे. कारण कवि भवभूति हा कान्यकुब्ज नगरीचा राजा यशोवर्मा याच्या पदरीं होता, असे उल्लेख इतरत्र आढळतात. तेव्हां श्रीकंठ याचा पहिलाच अर्थ ग्राह्य करण्यासारखा आहे.

# भवभूति संबंधीं कांहीं नवीन माहिती

## भवभूति

भवभूति हें नांव कांहीं कारणांनीं त्यास प्राप्त झालें. 'सांबा पुनातु भवभूतिपवित्रमूर्तिः', इत्यादिक प्रकारें राघवभट्ट इत्यादिक टीकाकारांनीं तीं कारणें स्पष्ट केलेलीं आहेत. पण त्यांनीं समाधान होत नाहीं. तीं कारणें काल्पनिक असावींत, असें वाटूं लागतें. कारण 'भूति' असा शब्द त्याकाळीं तरी ब्राह्मणांला लावीत नसत. पहा—

शर्मा देवः च विप्रस्य, वर्मा त्राता च भूभुजः
भूतिः दत्तः च वैश्यस्य, दासः शूद्रस्य कारयेत् ॥

हा अगोदर वैश्य असून मग ब्राह्मण झाला असावा, असा तर्क सुसंगत नाहीं. कारण आजच्या संशोधनाप्रमाणें त्याचा काळ जो निश्चित करण्यांत आलेला आहे, त्या काळाप्रमाणें पाहतां वर्ण गुण-कर्मोप्रमाणें ठरत नसून जात्यनुसारें ठरत असावेत. आणखी बलवत्तर कारण म्हणजे भवभूतीचें कुल वाजपेय यज्ञ करणाऱ्या कृष्ण यजुर्वेदी शाखेच्या ब्राह्मणाचेंच होतें. त्याचें स्पष्ट सांगणें अवमानून केवळ अनुमान करणें अयोग्य होय.

शिवाय 'भूति' अंत्य शब्द आपणांला वाटतो तितका अप्रसिद्ध नाहीं. उग्रभूति, रुद्रभूति, विश्वभूति, इंद्रभूति, देवभूति, वसुभूति, अग्निभूति, शिवभूति, सुभूति, याप्रमाणें पुष्कळ नांवें वाङ्मयांत उपलब्ध झालेलीं आहेत. त्यांतील बरेंच ब्राह्मण आहेत, आणि एक क्षत्रिय राजाहि आहे. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं हीं बरींच नांवें जैन ग्रंथांत आढळतात. 'भवभूति' याच नांवानें एका शिष्याचें पात्रहि यायावरीय कवि राजशेखर यानें आपल्या प्रचंड पांडव मामक नाटकांत रंगविलेलें आहे. हा कवि आपणांस भवभूतीचा अवतारच समजतो.

तेव्हां श्रीकंठ हें त्याचें नांव, आणि भवभूति हें त्याचें नंतरचें नांव, असें म्हणणें जास्त संयुक्तिक आहे. श्री. S. K. De मात्र भवभूति हेंच त्याचें नांव आहे, असें समजतात.

—Indian His. Quart. 1943.

## उम्बेक

'उम्बेक' असेंहि त्याचें नांव असावें, असें कांहीं टीकाकार समजतात. 'भारतके मध्यप्रदेशके इंदौर नगरमे मा. माधवकी एक हस्तलिखित प्रत मिली है. उसके तीसरे अंक मे 'इति कुमारिलशिष्यकृते,' छठे अंक के अंत मे 'इति कुमारिलस्वामिप्रसादवाग्वैभवः श्रीमदुंबेकाचार्यविरचिते मालतीमाधवे' लिखा हुवा है.

— पं. ज्वालाप्रसाद मिश्र

परंतु यासंबंधीं अजून नीटसें संशोधन झालेलें नाहीं.

## पंक्तिपावन

दुसरा प्रश्न पंक्तिपावनत्वाचा. त्याचा आतां विचार करूं.

टीकाकारांनीं 'आहारार्थं श्रेणीभावेन उपवेशनं पंक्तिपदार्थः, तां पावयंति पवित्रीकुर्वंति ते'...

— आचार्य श्री. रामचंद्र मिश्र.
विद्याभवन संस्कृत ग्रंथमाला.

— असा अर्थ दिलेला आहे. त्याला ते मनूचा आधार देतात. पहा —

१ अपांक्त्योपहता पंक्तिः पाव्यते यैः द्विजोत्तमैः ।
तान् निबोधत कार्त्स्न्येन द्विजाग्र्यान् पंक्तिपावनान् ॥
२ अग्र्याः सर्वेषु वेदेषु सर्वप्रवचनेषु च ।
श्रोत्रियान्वयजाश्चैव विज्ञेयाः पंक्तिपावनाः ॥

म्हणजे कोणीं तरी अपावन होते, आणि त्यांना कांहीं रीतींनीं पावन करून घेण्याची पद्धत होती; तसेंच कोणीं कांहीं कारणांनीं अपावनहि ठरत होते. भवभूतीचें कुल अपावनांना पावन करून घेणारें होतें.

पण मनाला लहानशी शंका या संबंधांत वाटून जाते, ती अशी कीं भवभूतीच्या कुलांतीलच कोणीं पंक्तिबहिष्कृत झालेला नसेल ना ?

भवभूतीचा काळ 'पंक्तिपावन' हा शब्द प्रचारांत आलेला असण्याचा असला पाहिजे. देवलस्मृति यासाठींच लिहिली गेली होती. मराठींत 'पंक्तिपावन' शब्द संस्कृतापेक्षां अगदीं उलट



अनुक्रमणिका

अर्थानें योजिलेला आढळतो. मूळच्या पतित झालेल्या माणसाला 'पावन' करून घेण्यांत आलें आहे, आणि आतां तो पंक्तींतहि पावन ठरला आहे, अशा अर्थाचा त्याचा प्रयोग आहे. पण भवभूती-विषयीं अशी शंका घेणें योग्य होणार नाहीं. कारण त्यानें ज्या गर्वोद्धत पद्धतीनें पंक्तिपावन शब्द उच्चारला आहे, त्याचा अर्थ असाच होतो कीं 'ते इतरांस पावन करणारे आहेत.' या कुलाचें जर तें भूषण नसतें, तर त्यानें असा उच्चार केला असतां काय ?

### उदुंबर

नंतरचा त्याचा महत्त्वाचा उल्लेख म्हणजे 'उदुंबर-नामधेयाः', उदुंबर नांवाचे. आजच्या भाषेत उदुंबराचें औदुंबर, औदुंबरे, डावरे, असे अपभ्रंश सहज होतील. त्यांची कुलकथा पाहिली असतां या नांवावर अधिक प्रकाश पडण्याची सहज शक्यता आहे.

उदुंबर हें गोत्रनाम म्हणजे आडनांव असावें. श्री. S. K. De आडनांवच समजतात. याच नांवाचा सहजगत्या उल्लेख एका समकालीन नाटकांत मिळतो. 'उदुंबरनाम्ना चारेण सह' अशा रीतीनें मुद्राराक्षस नाटकांत उल्लेख आलेला आहे. अमात्य राक्षस एका हेराबरोबर पळून जात आहे. त्या हेराचें नांव उदुंबर.

वास्तविकपणें हेराला कोणतें नांव द्यावें, हा प्रश्न लेखकाचा आहे. उदुंबर हें नांव त्यानें हेतुपुरःसरच दिलें आहे, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं.

पण लिखाणाची धाटणी पाहतां हें नांव त्या नाटककर्त्यानें बुद्धिपूर्वक दिलें आहे, असें वाटूं लागतें. असें पहा– 'अन्यत् प्रारंभे, अन्यत् निर्वहणे,' म्हणजे सुरुवातीला एका हेतूची रचना, आणि शेंवटीं उपसंहाराच्या वेळीं कांहीं अगदीं निराळी रचना असा कुकवीचा दोष त्या नाटककर्त्यानें दाखविला आहे.

त्याच विशाखदत्त कवीनें हा 'अन्यत् निर्वहणे,' असा दोष दाखविला आहे, असें नाहीं. जिनसेन नामक एक जैन कवि त्यासुमारास होऊन गेला. त्यानेंहि आपल्या महापुराणांत असें लिहिलें आहे–

> यथेष्टं प्रकृतारंभाः केचित् निर्वहणाकुलाः ।
> कवयः बत सीदंति कराक्रांतकुटुंबिवत् ।।

–म्हणजे निर्वहणाकुल झालेले पुष्कळ कवि त्याकाळीं होते. भवभूतीनें महावीरचरितें नामक जें नाटक लिहिलें आहे, त्यामध्यें असाच कांहीं दोष असावा, असें त्याकाळच्या लोकांना वाटलें असावें. त्या नाटकांत आणखीहि दोष असावेत. त्यामुळेंच टीका सपाटून झाली, आणि खवळून जाऊन म्हटलें—

> ये नाम केचित् इह न; प्रथयंति अवज्ञां ।
> जानन्तु ते किमपि, तान् प्रति न एष यत्नः ।।

### भवभूतीवर टीका कां झाली असावी ?

त्याच्या नाटकांत इतर काय दोष होते, तें आज आपणांस या लेखांत पाहावयाचें नाहीं. त्याच्यावर सपाटून टीका झाली होती, आणि ती 'निर्वहणाकुल' झाल्यामुळें असावी, असें अनुमान फारसें चुकणार नाहीं. त्याच संबंधांत नांव घेऊन मुद्राराक्षसकर्त्या विशाखदत्तानें भवभूतीस उदुंबर नांवानें संबोधलें असणें अप्रयोजक वाटणार नाहीं.

या विचाराला आणखी एक बाजू आहे; उदुंबराला हेरच कां केलें असावें ?

याचें उत्तर दोन प्रकारांनीं देतां येईल, एक तर महावीरचरितांत 'हेरखातें' प्रमाणाधिक्यानें वावरत आहे. आणि राजकीय उलाढाली बऱ्याच उरकलेल्या आहेत. त्या नाटकाची बैठकच राजकीय नाहीं तर इतके हेर कशाला ? राजकीय बैठक कशी, ती परशुरामानें रावणाला लिहिलेल्या पत्रावरून अगदीं स्पष्टपणें कळून येईल. तें पत्र मी या ठिकाणीं दिलेलें नाहीं.

### अनर्घराघवावरून अनुमान

दुसरें असें कीं – अनर्घ्यराघव नांवाचें एक नाटक मुरारि नांवाच्या एका कवीनें लिहिलेलें आहे. त्यांत त्यानें असें लिहिलें आहे कीं 'केनचित् कलहकंदलनाम्ना दक्षिणापथात् आगतेन कविना नित्यं किल अयं उद्वेजितः लोकः' हा उल्लेख स्पष्टपणें भवभूतीच्या महावीरचरितास लागूं पडत नाहीं काय ? महावीरचरितांत लढाईखेरीज दुसरें महत्त्वाचें काय आहे ? म्हणजे हा कवि नाटक रचण्यामध्यें 'निर्वहणाकुल' आहे, आणि नाटय-कथेंमध्यें 'कलहकंदल' आहे. हे दोन प्रमुख दोष दोन निरनिराळया कवींनीं दाखविलेले आहेत. म्हणजेच विशाखदत्तानें उदुंबर नांवानें तिरस्कार-पूर्वक भवभूतीचाच उल्लेख केलेला आहे, असें म्हणणें प्राप्त होतें.

मग साहजिकच मनामध्यें प्रश्न उत्पन्न होतो, या कवीनें असा मार्ग कां स्वीकारला ? आणि स्वतः-वर टीका कां ओढवून घेतली ? नाटकांत काय पाहिजे, हें त्याला नीट माहिती होतें. तोच म्हणतो—

यत् प्रौढित्वं उदारता च वचसां,
यत् च अर्थतः गौरवं

—आणि असेंहि म्हणतो— तान् प्रति न एष यत्नः ॥ म्हणजे त्याची ही रचना बुद्धिपुरःसरच आहे. नाहीं-तर राजकीय स्थिति कां चितारावी, आणि 'महा-वीराचें' नांव घेऊन 'रामानें रावणास मारिलें,' असें कथानक कां गुंफावें ?

याठिकाणीं एवढेंच पाहाणें योग्य कीं 'उदुंबर' या नांवानें मुद्राराक्षसांत जो उल्लेख सांपडतो, तो या भवभूति ... उदुंबरासंबंधींच असावा. मग असे उल्लेख इतर वाङ्मय ग्रंथांतूनहि असले पाहिजेत, सांप-डले पाहिजेत. आज ते कदाचित् सांपडत नसतील.

### जातूकर्णि पुत्र

आतां प्रश्न आहे 'जातूकर्णिपुत्रः' याचा. हा जतुकर्ण कोणी एक कृष्णयजुर्वेदी शाखेचा अति-प्राचीन प्रणेता होता. उत्तरचरित की टीका मे स्वर्गीय विद्यासागरनें लिखा है... दिव्यावदान के मतानुसार अनुमान होता है कि भवभूति के माता-मह यजुर्वेद की जातुकर्ण शाखा के अंतर्गत थे, और इसीलिए भवभूति की माता जातूकर्णि नाम से प्रसिद्ध हुई.

— ज्वालाप्रसादशर्मा-भवभूति, पान २३.

आपल्या आईचें नांव इतर कोणत्याहि संस्कृत ग्रंथकर्त्यानें अशा प्रमुख स्वरूपांत दिलेलें नाहीं. ही अशीं नांवें देण्याची पद्धत जैन ग्रंथकर्त्यांची नित्याची आहे. तेव्हां असें अनुमान बांधावेसें वाटतें कीं जैनधर्मीयांच्या सहवासाचा असा परिणाम घडून आला असावा काय ? भवभूतीचा काळ आज सर्व-सामान्यतः जो ठरवला गेला आहे, त्या दोन तीन शतकांमध्यें जैन लोकांचें बरेंच प्राबल्य हिंदुस्थानांत होतें, असें दिसून येतें. त्यांच्या प्राबल्यापुढें मान झुकवून जसें 'महावीरचरितं' हें नांव दिलें असावें, त्याप्रमाणेंच त्यानें आपलें नांव सांगण्याची पद्धतहि जैन लोकांना अनुसरून केलेली असावी.

### कालप्रियनाथः

त्याचीं तिनीहि नाटकें कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगीं घडून आल्याचें तो सांगत आहे. पूर्वींच्या काळीं अशीं यात्रांच्या प्रसंगीं नाटकें होत असत. पहा—

१. कंसवधं – महाकवि श्रीशेषकृष्णप्रणीतं ...
भगवतः श्रीविश्वेश्वरस्य यात्राप्रसंगसंगतैः
२. चैतन्यचंद्रोदयं—कविकर्णपूरविरचितं
भगवतः श्रीपुरुषोत्तमस्य गुंडिचा यात्रायां
३. सुभद्राहरणं—माधवभट्टविरचितं
श्रीपर्वते श्रीकंठपरिचरणाय दूरात् उपागताः
४. विद्यापरिणयनं—आनंदरायमखिविरचितं
तंजारनगरे... भगवत्याः आनंदवल्ली—अंबायाः
महोत्सवदिदृक्षया...
५. कर्णसुंदरी—महाकवि श्रीविल्हणविरचिता
भगवतः नामेयस्य यात्रामहोत्सवे...










६. वृषभानुजा – श्रीमथुरादासविरचिता
श्रीराधामोहनस्य विहारवनस्थलीनां...

७. जीवानंदनं – आनंदरायमखिप्रणीतं
अत्र तंजापुरे देशांतरागताः बृहदीश्वररथोत्सवदिदृक्षया ...

८. विदग्धमाधवं – श्रीरूपगोस्वामिप्रणीतं
इह किल – नंदनंदनस्य – केशितीर्थोपकंठे –

९. प्रसन्नराघवं – जयदेवकविविरचितं –
भगवतः शंकरस्य यात्रायां –

१०. अनर्घराघवं – मुरारि :
भगवतः पुरुषोत्तमस्य यात्रायां –

११ भर्तृहरिनिर्वेदं – श्रीहरिहरोपाध्यायनिर्मितं
भगवतः भूतपतेः भैरवेश्वरस्य यात्रायां –

१२. उन्मत्तराघवं – श्रीमद्भास्करकविविरचितं
विद्यारण्यश्रीचरणारविंदवंदनमहोत्सवमिलितेन इत्यादि

हा कालप्रियनाथ कोण होता, तें अद्यापि नीटसें उलगडलेलें नाहीं. तत्संबंधींचीं निरनिराळीं मतें येथें एकत्रित देणें अनुचित ठरणार नाहीं —

१. उत्तररामचरिताचा टीकाकार वीरराघव लिहितो –

भगवतः ज्ञानशक्त्यादिगुणवतः कालप्रियानाथस्य कालप्रिया नाम अंबिकायाः नाथः शिवः, तस्य –

२. निर्णयसागरी टीकाहि उल्लेखनीय आहे –

महाकालाभिधेयं चंडीश्वरस्थानं सांप्रतं अपि प्रथितं वरीवर्ति उज्जयिन्यां –

३. विद्यासागर –

विदर्भदेश के पद्मनगर में कालप्रियानाथ की मूर्ति प्रतिष्ठित थी.

४. आनंदराम बरुआ आदि के मत में –

' अयं उज्जयिनी निवासी भगवान् महाकालनाथः ' बालरामायण से प्रमाण करते हैं.

५. कथासरित्सागर–

यस्यां वसति विश्वेशः महाकालवपुः स्वयं
शिथिलीकृतकैलासनिवासव्यसनो हरः ॥

६. स्कंदपुराण–

तथा पुण्यतमं देवि महाकालवनं शुभं
यत्रास्ते श्रीमहाकालः पापेंधनहुताशनः ॥

— वरील उताऱ्यांवरून असें दिसून येईल कीं उज्जयिनीचा महांकाळ म्हणजेच कालप्रियानाथ.

७. कालप्रियनाथः– तदाख्यस्य देवविशेषस्य ...

कालप्रिया अंबिका, तस्याः नाथस्य शिवस्य, इति व्याख्याय केचित् कालप्रियानाथस्य इति पठंति, तद् न युक्तं, कालप्रियायाः नाथः इति अभिधानस्य भवानीपतिशब्दवत् पत्यंतर–प्रतीतिकारितया विरुद्धमतिकारिताख्य दोषापत्तेः ।

— विद्याभवनसंस्कृतग्रंथमाला– श्री रामचंद्रमिश्रः

याप्रमाणें कोणी त्याला स्वतंत्र देवच समजतात. तर वाराहपुराण आदिक ग्रंथावरून प्रा. मिराशी इ. कालप्रियनाथ म्हणजे सूर्य असें मानतात.

पण पुढील दोन उताऱ्यावरून कालप्रियनाथ कोठें होता, आणि तो महांकाळापासून कसा भिन्न होता, हें स्पष्टपणें कळून येईल. तो देव कोण, हें मात्र स्पष्टतया कळणार नाहीं.

— एपिग्राफिका इंडिका, पु. III. पान ३८ वर श्लोक १९ कॅंबे प्लेट. यावरून असें दिसून येईल कीं राष्ट्रकूट राजा गोविंद, त्याचा पिता इंद्र III यानें उत्तरेकडे जी स्वारी केलेली होती, तत्संबंधींचा हा श्लोक आहे. श्लोकाचें इंग्रजी भाषांतर तसेंच देत आहें–

The courtyard of कालप्रिय became uneven by the strokes of the tusks of his rutting elephants. His steeds crossed the unfathamable यमुना which rivals the sea. He completely uprooted the hostile city of महोदय which is even to-day greatly renowned by the name —कुशस्थल.

म्हणजे कालप्रियनाथ ही एक प्रसिद्ध देवता होती; तिच्या देवळाचें आवार मोठें होतें. तें देऊळ

यमुनेच्या कांठीं असलेल्या महोदय म्हणजे कनोज शहरामध्यें होतें. इंद्रराजानें तें उध्वस्त केलें.

हा दुसरा उतारा भोजराजानें लिहिलेल्या शृंगारमंजिरींतील आहे.

भगवतः कालप्रियदेवस्य मधुसमययष्ठीयात्रायां आत्तकमनीयवेषः तं एवं भगवंतं प्रेक्षितुं अयासीत्...

– Text Mss. Page 96.

म्हणजे कालप्रिय हा एक देव आहे. त्याची यात्रा भरत असते. ती यात्रा मधुसमय म्हणजे चैत्र वैशाखांत भरत असते. त्या यात्रेच्या वेळीं काठ्या वापरीत असत. देवाचें स्वरूप मात्र कळलें नाहीं.

हा कालप्रियनाथ उज्जयिनींतील महांकाळापेक्षां निराळाच कोणी होता, असें भोजराजाला निश्चितपणें माहिती होतें. कारण तोच सांगत आहे–

अस्ति अवंतिषु उज्जयिनी नाम नगरी. यत्र त्रिभुवनपतिः अपि विलासलोभेन रमणीहृतहृदयः कैलासवासं उत्सृज्य श्रीमहाकालनाथः प्रतिवसति.

– Text Mss. Page 41

याप्रमाणें हा तत्कालीन वाङ्मयांतील पुरावा शेंकडों अनुमानापेक्षां अधिक बलवान् आहे, असेच संदर्भ इतरहि वाङ्मयांत उपलब्ध होण्यासारखे आहेत.

## त्याचे गुरु

त्यानें आपल्या गुरूचेंहि नांव दिलें आहे. ज्ञाननिधि हें त्यांचें नांव. ते परमहंसांमध्यें श्रेष्ठ होते. त्यांचें नांव सार्थ होतें, असें त्यानें सांगितलें आहे.

तो स्वतः वेदवेदांगांमध्यें पारंगत होता. न्यायशास्त्रहि त्यास अवगत होतें. त्याच्या कुळांतील इतरांनीं वाजपेय यज्ञ केले होते. ते वेदशास्त्रांतील शाखांत निष्णात होते. श्री. S. K. De म्हणतात–तें वेद शिकवीत असत (चरणगुरवः) तसेंच– He had a rich and varied experience of life and stood, as he himself tells us, in friendly relations with actors... He had to struggle hard for fame and fortune.

## त्यांचीं नाटकें

यानें तीन नाटकें लिहिलेलीं उपलब्ध आहेत. महावीरचरितं, माल्तीमाधवं, व उत्तररामचरितं. यांतील मालतीमाधव हें नाटक शृंगाररसप्रधान आहे, महावीर हें वीररसप्रधान, आणि उत्तरराम हें करुणरसप्रधान आहे. या तीनहि नाटकांत उत्तरराम चरितं हें सर्व रसिकांस आवडलेलें आहे.

## महावीरचरितं

महावीरचरितांत रामानें रावणास मारिलें, ही हकीकत आहे. एकूण नाटक ७ अंकीं आहे. पण ६ व ७ हे अंक उत्तरभारत आणि दक्षिण भारत यांत सांपडलेल्या प्रतींत भिन्न भिन्न आहेत. पांचव्या अंकांतील ४६ श्लोकापर्यंतच भवभूतीची कृति आहे. 'एतावत् भवभूतेः, अग्रे कविनायकविनायकभट्टेः इति' हा विनायक कोण तें माहिती नाहीं. म्हैसूरकडील प्रतींत सुब्रह्मण्यशास्त्रींचा 'सर्वतः प्रचलितः पाठः', आहे. हें महावीरचरितं दक्षिणेकडे तेलगु लिपींत सांपडलें, उत्तरेकडे शारदा लिपींत लिहिलेलें सांपडलें आहे.

या दोन अंकांच्या विसंगतीबद्दल श्री. तोडरमल्ल म्हणतात कीं भवभूतीनें प्रथम अंक लिहिले, मग विद्वानांना दाखविले; त्यावर कठोर टीका झाल्यावर त्यानें दुसरे अंक त्याऐवजीं लिहिले असावेत. पण हें विधान पटण्यासारखें नाहीं. त्यानें कांहीं विशेष हेतूनें हें नाटक रचिलें होतें, तो हेतु तत्कालीन समाजाला मान्य झाला नाहीं, असें मला वाटतें. हेतु राजकीय होता. त्याचा हेतु कांहीं निराळाच होता, हें भरतवाक्यावरूनहि दिसून येत आहे.

(अ) लोको नित्यं प्रमोदं,
विदधतु कवयः श्लोकं आत्मप्रसादं,
संख्यावंतोऽपि भूम्ना
परकृतिषु मुदं संप्रधार्यं प्रयांतु ॥








दुसरें भरतवाक्य-

(ब) संदर्भो विदुषां
अमंदहृदयानंदाय संजायतां ॥

वाल्मीकि रामायणांतील कथानकांत त्यानें बराच बदल केलेला आहे– श्री. S. K. De म्हणतात, In making daring but judicious changes even in a well-known and acepted story, भवभूति given evidence not only of the boldness and power of ingenious invention, but also of the scene of dramatic construction.

– Indian His. Quart. 1943.

**हेतु काय असावा ?**

श्री. S. K. De चें म्हणणें कसेंहि असलें तरी एकूण असें वाटतें कीं महावीरचरितं लिहीत असतांना भवभूतीला कोणा एकासमोर असलेल्या राजाचें वर्णन करण्याची इच्छा झालेली आहे. भवभूति यशोवर्म्याचा आश्रित होता. त्यानें दिग्विजय केलेला होता. तोच दिग्विजय भवभूतीनें महावीरांत वर्णिलेला आहे. वाक्पतिराज नामक कवीनें गउडवहो नामक प्राकृत काव्यांत त्याच्याच दिग्विजयाचें वर्णन केलेलें आहे. प्रो. पंडित यांच्या मतानें गउडवहो म्हणजे यशोवर्म्याचा पोवाडाच आहे. हें महावीर तसेंच आहे.

पं. ज्वालाप्रसाद शर्मा यांनीं भवभूतीवर एक लहानसें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत ते म्हणतात -ईसा की ७ शताब्दीसे १४ शताब्दीतक...... दार्शनिको और भवभूति, माघ......आदि कवियोंने जन्म लेकर किस तरह बौद्ध-धर्म-प्लावित भारत-वर्ष मे ब्राह्मण धर्म को फिर स्थापित किया... ...याजिन महात्माओंने विविध उपायोंसे ब्राह्मणधर्म को पुनर्जीवित किया, उनमेसे अन्यतम महाकवि भवभूति के काव्य की कुछ समालोचना करना हि इस छोटीसी पुस्तिका का एकमात्र उद्देश है. ( पान १ ).

महावीराच्या प्रस्तावनेंत स्वतः कवीनें हें स्पष्ट सांगितलें आहे-धर्मद्रुहः दमयितुः चरितं निबद्धं.

त्याकाळाचा विचार करतां आणि इतर कवींच्याहि काव्यांच्या विषयाचा विचार करतां वरील विचार अगदीं अयथातथ्य आहे, असें वाटणार नाहीं. पुढें कांहीं कवि, त्यांचीं काव्यें, आणि त्यांचा काळ दिलेला आहे. हीं अवतरणें संस्कृत शब्दकोशांतून घेतलेलीं आहेत. मराठीकरण माझें आहे—

| कवि | शतक | काव्य |
|---|---|---|
| १ भवभूति | सुमारें ७ वें शतक | उत्तरराम व महावीरचरितं |
| २ भारवि | ,, | किरातार्जुनीयं |
| ३ माघ | ,, | शिशुपालवधं |
| ४ विशाखदत्त | ,, | मुद्राराक्षस |
| ५ दंडिन् | ,, | दशकुमारचरितं |
| ६ भट्टनारायण | ,, | वेणीसंहार. |
| ७ भट्टि | ,, | भट्टिकाव्य (रावणवध). |

[ यांतील २२ वा सर्ग भवभूतीशीं समान आहे. ज्वा. शर्मा ] पान ६३.

| | | |
|---|---|---|
| ८ रत्नाकर | सुमारें ८ वें शतक | हरविजयमहाकाव्य. |
| ९ श्रीशंकराचार्य | सुमारें ७ वें शतक | भाष्यत्रयं. |
| १० भर्तृहरि | ,, | शतकत्रयं. |

आणखी एका दृष्टीनेंहि याचा विचार करतां येईल : सदुक्तिकर्णामृतं इ. सुभाषितग्रंथांत पुढील श्लोक सांपडतो—

उन्नीतो भवभूतिना प्रतिपदं, बाणे गते यः पुरा,
यः चीर्णः कमलायुधेन सुचिरं, येन अगमत् केशटः ।
यः श्रीवाक्पतिराजपादरजसां संपर्कपूतः चिरं
दिष्टया श्लाघ्यगुणस्य कस्यचित् असौ मार्गः समुन्मीलति ॥

– योगेश्वरस्य

म्हणजे बाणानें हर्षचरित लिहिलें; भवभूतीनें महावीरचरितं लिहिलें; वाक्पतिराजानें गउडवहो म्हणजे यशोवर्मचरितच लिहिलें. त्याप्रमाणेंच कमलायुध, केशट, योगेश्वर, इत्यादिक कवींनींहि चरितें लिहिलीं



अनुक्रमणिका

आहेत; आणि तीं ऐतिहासिक आहेत. या एकमेव कवींचा एकमेकांच्यावर परिणाम झालेला आहे. तेव्हां वर जें विधान भवभूतीसंबंधीं केलेलें आहे तें अधिक चिंतनीयच ठरत आहे. त्याचें नाटक ऐतिहासिक आहे.

### मालतीमाधवं

त्याचें दुसरें नाटक मालतीमाधवं. मालती व माधव, आणि मदयंतिका आणि मकरंद, यांची प्रेम-कहाणी वर्णिलेली आहे. ही कथा कथासरित्सागरांत सांपडते. यांत वर्णिलेला कथाभाग राजतरंगिणींतील एका प्रसंगावरून घेतला असावा अशी शंका विचाराअंतीं उत्पन्न होते. ती हकीकत, थोडक्यांत अशी –

जयापीड नामक एक राजा काश्मीरांत होऊन गेला. त्यानें कनोजवर स्वारी करून तें जिंकून घेतलें. परंतु काश्मीरांत त्याचा एक नातलग 'जज्ज', त्यानें बंड करून त्याचें राज्य बळकाविलें. तेव्हां जयापीडानें अज्ञातवास पत्करिला. कमला नामक एक नर्तकी होती, तिच्याकडे तो राहिला. तिनें त्याला भुलविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. राज्यसंप्राप्तिखेरीज त्याला कशानेंच समाधान होणारें नव्हतें.

तेथें असतांनाच एका सिंहानें नगरांत हलकल्लोळ उडविला असल्याचें समजलें. ती कमला, जयापीड एकदां उशिरा आल्यानें पार घाबरून गेलेली होती. तिनें आपली अवस्था सांगितल्यावर जयापीड हंसला. दुसरे दिवशीं रात्रीं हंसत हंसत बाहेर पडला. त्यानें त्या सिंहाचा नाश केला.

त्या सिंहाचें वर्णन, ही हकीकत आणि मा. माधवांतील शार्दूलहनन एकमेकाला सुसदृश वाटतात.

ही अगदीं रसविहीन हकीकत भवभूतीनें आपल्या नाटकांत रसोत्कटरीतीनें वर्णिलेली असावी. मालतीमाधव आणि रसतरंगिणी यांतील हे दोन उतारे शेजारी शेजारीं ठेऊन तोलून पहाण्यासारखे आहेत.

### उत्तररामचरितं

त्याचें तिसरें नाटक उत्तररामचरितं. याच उत्तररामानें भवभूतीला अपरंपार कीर्ति मिळवून दिली. करुणरसहि प्रधान होऊं शकतो, आणि इतर रसहि त्यांत मिसळूं शकतात, त्याचें हें नाटक जणुं प्रात्यक्षिकच आहे. केवळ कल्पनेनेंहि किती मधुर घटना निर्माण करतां येतात, मूळ कथानक किती प्रभावी रीतीनें बदलतां येतें, याचें हें उदाहरणच आहे.

या उत्तररामचरितांतहि ऐतिहासिक प्रसंग गुंफिलेला आहे. राम-म्हणजे राजा यशोवर्मा. त्यानें सीतेचा त्याग केलेला आहे. नंतर तिला आपल्या मुलांच्या समवेत स्वीकारलेलें आहे. यशोवर्मा राजानेंहि आपल्या सुयशा नामक पत्नीचा त्याग केलेला होता. नंतर त्यानेंहि तिला पुत्रासमवेत पुनः स्वीकारलेलें आहे. दोघींच्या त्यागाचें कारणहि सारखें आहे. त्यांच्या स्वीकाराचें कारणहि सारखेंच आहे. उत्तररामांतील ७ वा गर्भांक असा साभिप्राय आहे.

महावीरचरितांतील आणि उत्तररामचरितांतील हकीकतींत बरीच तफावत आहे.

### भवभूतीनें स्थानांतर कां केलें असावें ?

भवभूति हा मूळ विदर्भांतील. पण कांहीं कारणांमुळें त्याला आपलें पद्मपुर सोडून द्यावें लागलें होतें. डॉ. केतकरांच्या मतें तो माळवा देशांतील उज्जयिनीला आला, आणि तेथील महांकाळाच्या मंदिरांत आपल्या नाटकाचे प्रयोग करून दाखविले. पण तेथील लोकांना कालिदासाच्यामुळें वैदर्भीरीति आवडत असल्यानें भवभूतीची ही समासप्रचुर गौडीरचना आवडली नाहीं. त्याची तेथें उपेक्षा झाली, म्हणून तो कनोजचा राजा यशोवर्मा याच्या आश्रयास गेला.

पण या वाङ्मयीन कारणापेक्षां त्याचें कारण राजकीयच असावें. कारण भतभूति ज्या दक्षिणापथांत राहात होता, त्यावर राष्ट्रकूट वंशीयांचें राज्य त्या काळीं होतें. हे राष्ट्रकूट वैदिकमत विरोधी होते.

ब्रिल्हणानें विक्रमांकदेवचरितं नामक एक काव्य लिहिलें आहे, त्यांत त्यानें 'विश्वंभराकंटक-राष्ट्रकूट' ... अशा पंक्तीनें राष्ट्रकूटांची कुचेष्टा केलेली आहे. त्या राष्ट्रकूटांच्या कारकीर्दींत धर्मच्छल होणें स्वाभाविक होतें. त्यालाच कंटाळून भवभूति उत्तरेकडे कनोजला यशोवर्म्याकडे आला असावा. कनोज ज्या मध्यदेशांमध्यें आहे, तो ह्युएन्त्संगच्या मतानें सुद्धां वैदिक धर्मानुयायीच होता. मध्य-देशासंबंधी राजशेखर सांगतो– राजशेखर states that मध्यदेश lies between उत्तरापथ, पूर्व-देश, दक्षिणापथ and पश्चाद्देश. It extends from the हिमालय to the विंध्य and from विनशन to प्रयाग. हेमचंद्र agrees with राज-शेखर ingard to the exlent of मध्यदेश. पुरुषोत्तम lays down that कुरुक्षेत्र is विन-शन. वैजयंति differs from the above authorities and includes कलिंग and कुंतल in the मध्यदेश.

– Indian His. Quart. 1943.

या यशोवर्म्यानें रामाभ्युदयं नामक नाटक लिहिलें होतें. म्हणजे तोहि वैदिकधर्मानुयायी होता. तेव्हां भवभूतीनें त्याच्याकडे आश्रय घेणें अगदींच अवास्तव होतें, असें नव्हे.

## उपसंहार

भवभूतीच्या कौटुंबिक आयुष्याबद्दलची कांहीं माहिती नाहीं. त्याचा शेवट कसा झाला, तेंहि माहिती नाहीं. एवढ्या मोठ्या कवीची एवढी थोडी माहिती उपलब्ध आहे. इतर वाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास केल्यास आणखीहि माहिती मिळणें शक्य आहे. मी ही जमा केलेली माहिती विद्वानांच्या परिशीलनासाठीं मी सादर करीत आहे.

—

श्री. म. ह्. दाते

# नासदीय सूक्त : ४ :

' अद्वैतमात्मनस्तत्त्वं दर्शयंतौ मिथस्तराम् ।
तौ वंदे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ॥

आपलें अद्वितीयत्त्वच एकमेकांच्या साहचर्यानें प्रत्ययांस आणून देत असतात. ( तस्मात् ) त्या जगाच्या आद्यांना त्यांच्या यथार्थ स्वरूपाची प्राप्ती व्हावी म्हणून मी ( श्री ज्ञानेश्वरांच्या शब्दांतच ) नमस्कार करतों.– ( अमृतानुभव )

मागील लेखांत नासदीय सूक्ताच्या तीन ऋचांचा विचार केला. आतां या लेखांत त्या सूक्तांतील चवथ्या व पांचव्या ऋचांचा एकत्र विचार करावयाचा आहे.

## चवथी ऋचा

' कामस्तदग्रे समवर्तताधि
मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।
सतो बन्धुमसति निरविन्दन्
हृदि प्रतीच्या कवयो मनीषा ॥

## लो. टिळक

( त्याच्या ) मनाचें जें रेत म्हणजे बीज प्रथमतः निघालें, तोच आरंभी काम ( सृष्टि निर्माण करण्याची प्रवृत्ति किंवा शक्ति ) झाला. हाच असतामध्यें म्हणजे मूळ परब्रह्मांत सताचा म्हणजे विनाशी दृश्य सृष्टीचा ( पाहिला ) संबंध होय, असें ज्ञात्यांनीं अन्तः-करणांत विचार करून बुद्धीनें निश्चित केलें आहे.

## श्री शंकराचार्य

' कामस्तदग्रे ' ही ह्या सूक्तांतील चवथी ऋचा आहे. परब्रह्मसंबंधीं जें मन, त्याचें जें आद्यकार्य प्रथम होतें, तें सृष्टीचे आरंभी काम बनून आधिक्यानें प्रकट झालें. सारांश एकमेवाद्वितीय, सत्य, ज्ञान, अनंत इत्यादि रूप जी ब्रह्मवस्तु सृष्टीचे पूर्वी तमानें आच्छादित होती; त्या तमानें व्याप्त झालेल्या ब्रह्माचें सुसृक्षारूप जें मन प्रथम उत्पन्न झालें, त्या मनाचें काम हेंच प्रथम कार्य होय. सुसृक्षा म्ह० उत्पन्न करण्याची इच्छा. तो काम उपनिषदामध्यें 'सो कामयत् बहुस्यां प्रजायेय ' अशा रीतीनें स्पष्टपणें सांगितला आहे. एक म्हणजे अद्वितीयरूप असा मीच नाना प्रकारें होईन, त्याविषयीं हा उपाय आहे. पूर्वी असलेलें जें अद्वितीय रूप त्याला बाध न आणतां माया कल्पित जगत् रूपानें मी उत्पन्न होईन; हा त्या उपनिषद् वाक्याचा अर्थ होय. तो काम सताचा बंधु आहे. सत् म्हणजे सद्रूपानें अनुभवाला येत असलेलें, भूत भौतिक रूप जगत् असत्संज्ञक, अव्यक्त तमाचे ठिकाणीं जगताच्या बंधाचें जें कारण, तो काम होय; कारण कामच अज्ञानाचे ठिकाणीं सर्व व्यवहार प्रतिबद्ध करीत असतो. ज्याप्रमाणें निजलेल्या पुरुषाचे ठिकाणीं उत्पन्न झालेली चित्तवृत्ति नाना प्रकारचा स्वप्न-व्यवहार बद्ध करिते, अथवा जागृत अवस्था असतां-नाहि अत्यंत अलभ्य जो विषय त्या संबंधानें उत्पन्न झालेली तृष्णा, सुख, अथवा दुःख हें ज्याचें पर्यवसान आहे, अशा प्रकारच्या मनोराज्यरूप व्यवहारामध्यें पुरुषाला बद्ध करून टाकीत असते, त्याचप्रमाणें परमेश्वराचा हा काम देव, पशुपक्षी, मनुष्यें इत्यादिकांचा सर्व व्यवहार बद्ध करून टाकीत असतो. कवि म्हणजे विद्वान्, वेद पारंगत पुरुषांनीं हृदयकमलाचें ठिकाणीं स्वतःच्या बुद्धीनें विचार करून, असतामध्यें म्हणजे अव्यक्त तमामध्यें असलेला काम हा उत्पन्न होणाऱ्या जगताचें बंधन होय, असें निश्चित ठरविलें आहे. 'अथो खल्वाहुः काममय एवायं पुरुषः' ह्या वाजसनेय ब्राह्मणांतील श्रुतिमध्यें कामच सर्व व्यवहाराचें कारण होय, असें सांगितलें आहे. ' काम बंधन-मेवेदं नान्यदस्तीह बंधनम् ' ह्या व्यास श्रुतींतील वचनांतहि असेंच सांगितलें आहे, आणि आमचा अनुभवहि तसाच आहे; कारण कोणीहि पुरुष प्रथमतः मनामध्यें कांहीं तरी इच्छा धरून त्या करितां प्रयत्न करूं लागला असतां, त्याला सुख किंवा दुःख प्राप्त होत असतें. तस्मात् ज्या अर्थी श्रुति, स्मृति व अनुभव ह्या तिहीवरून सिद्ध होत आहे, त्याअर्थी



अनुक्रमणिका

कामच सर्व व्यवहाराचें कारण होय, असा विद्वानांचा निश्चय आहे.

**पांचवी ऋचा**

'तिरश्चीनो विततो रश्मिरेषाम्
अधःस्विदासीदुपरि स्विदासीत् ।
रेतोधा आसन् महिमान आसन्
स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् ॥

**लो० टिळक**

( हा ) रश्मि म्ह० धागा किंवा किरण यांच्या ( मध्यें ) आडवा पसरला, आणि खालीं होता म्हटलें तर वरहि होता. ( त्यांच्यांतले कांहीं ) रेतोधा म्ह० बीजप्रद झाले, व ( वाढून ) मोठेहि झाले. त्यांचीच स्वशक्ति अलिकडे व प्रयति म्ह० प्रभाव पलिकडे ( व्यापून ) राहिला.

**श्री शंकराचार्य**

'तिरश्चीनो विततो रश्मि०' ही पांचवी ऋचा होय. सूर्यकिरणासारखा कांहीं एक स्वयंप्रकाश चैतन्य पदार्थ आहे. तो पदार्थ भौतिक रूप जगद्वस्तूमध्यें तिर्यक असून व्याप्त आहे. तो हा चैतन्यरूप परमात्मा ह्या पदार्थाच्या अधोभागीं आहे किंवा ऊर्ध्वभागी आहे ? स्विद् हा जो शब्द दोन ठिकाणीं आला आहे तो विकल्पित दोन पक्ष स्वीकारण्याकरितां आला आहे, आणि दोन विचार दर्शविण्याकरितां दोन ठिकाणीं प्लुति आलेली आहे. प्लुति म्हणजे प्लुत स्वर. ( ऱ्हस्वापेक्षां लांब असलेला दीर्घ आणि दीर्घापेक्षां लांब असलेला प्लुत होय. ) सारांश, तो हा प्रकाशरूप चैतन्य पदार्थ सर्व वस्तूंमध्यें दृष्टी पडत असतो; आणि वस्त्रांतील दीर्घ तंतूप्रमाणें व्याप्त होऊन राहिल्यासारखा भासत असतो. तो खालून पाहूं गेलें असतांहि तेथेंच भासत असतो आणि वरून पाहूं गेलें असतांहि तेथेंच भासत असतो. तस्मात् अधोभागीं, ऊर्ध्वभागीं आणि मध्यभागीं भासमान होत असल्यामुळें एकाच ठिकाणीं तो परमात्मा राहिला आहे. असें म्हणतां येणें शक्य नाहीं. ( ज्याचें जें झालेलें असतें तें त्याचें उपादान कारण असतें. उदा० घट मृत्तिकेचा झालेला असतो, ह्यास्तव मृत्तिका हें घटाचें उपादान कारण होय. ) ज्याप्रमाणें घराचें उपादान कारण असलेला मृत्पिंड घटाच्या अधोभागीं, ऊर्ध्वभागीं व मध्यभागीं म्हणजे अर्थात् सर्व ठिकाणीं असतो, त्याचप्रमाणें हा परमात्माहि स्वकार्याचें ठिकाणीं व्यापून राहात असल्यामुळें अधोभागीं आहे, किंवा उर्ध्वभागीं आहे, असा त्याविषयीं कांहीं निश्चय करतां येणें शक्य नाहीं. हें सर्वहि भूत भौतिक पदार्थ पूर्वी निर्दिष्ट केलेलें जें व्याप्त किरणरूप स्वप्रकाश चैतन्य त्याचें साररूप धारण करणारें होतें. चिदैकरस वस्तूंचें सद्रूप हें सार होय, व हें सार सर्व पदार्थ धारण करीत असतात; कारण 'अस्ति' ह्याच स्वरूपानें सर्व पदार्थांचा भास होत असतो. ते सद्रूपधारी सर्वहि पदार्थ पर्वत, नद्या इत्यादिरूपानें मोठे होते. असो, ह्याचप्रमाणें 'स्वधा' ही ज्याला संज्ञा आहे, म्हणजे माया, अविद्या इत्यादि शब्दानी जिचा निर्देश केला जातो, अशी जी परमेश्वरी शक्ति, ती जगताचें निकृष्ट कारण होय. ही शक्ति ज्या परमात्म्याच्या आश्रयाला राहून प्रयत्न करीत असते तो हा शक्ति प्रयत्नाला आधारभूत असलेला परमात्मा 'प्रयति' होय. सारांश परमात्म्याला 'प्रयति' असें म्हणतात. तो परमात्मा जगताचें उत्कृष्ट कारण होय. त्या ह्या उभयता जगतकारणरूप शक्तिपरमात्म्यांनाच शास्त्रामध्यें प्रकृति पुरुष असें म्हणतात.

**संत व श्रुति यांच्या** अनुभवी वचनांनीं या सूक्तांचा काय अर्थ होतो तो पाहूं :

मी संतांच्या वचनांचाच कां आधार घेतो ? तर त्यास कारणहि तसेंच आहे. संतांची थोरवी फार मोठी आहे.

**श्रीएकनाथ संतांचें** असें वर्णन करितात—

१. 'संत आधीं देव मग ।
हाचि उगम आणा मना ॥
देव निर्गुण संत सगुण ।
म्हणोनि महिमान देवासी ॥
नाम रूप अचिंत्य जाण ।
संतीं सगुण वर्णिलें ॥
मुळीं अलक्ष लक्षा नये ।
संतीं सोय दाविली ॥
एका जनार्दनीं संत थोर ।
देव निर्धार धाकुला ॥
२. संताचा महिमा देवचि जाणे ।
देवाची गोडी संतासी पुसणें ॥



अनुक्रमणिका








ऐसी आवडी एकमेकां।
परस्परें नो हे सुटिकां ॥

## काम–मन–सत्–असत्

प्रेमाचें प्राचीन वैदिक रूप '**काम**' आहे. प्रेमापेक्षांहि हा काम शब्द फार व्यापक आहे. त्याचप्रमाणें '**मन**' शब्द येथें मन ह्या सामान्य अर्थानें नसून '**जीव–आत्मा**' ह्या अर्थानें आहे. '**सत्**' हा शब्द जीव व '**असत्**' हा शब्द **शिव-परमात्मा** ह्या अर्थी आहेत.

संतांचें 'सहज बोलणें' गमतीचें पण 'हित उपदेशांनीं' भरलेलें असतें. श्रुति–स्मृति व अनुभव यांना सोडून तें कधींच नसतें.

## श्री ज्ञानेश्वर–

मनाचिये वाती लावू गेलिये ज्योती
तें अवघींच प्राप्ती ज्योती रूपें।
तेथें ब्रह्म गर्भा आलें ब्रह्म गर्भा आलें
लय लक्षीं उरलें बाई यावो ॥
"द्वा सुपर्णा सयुजा सखाया
समान वृक्षं परिषस्वजाते।
तयोरन्यः पिप्पलं स्वादु–अत्ति–अनश्नन्
अन्य अभिचा कशीति ॥

— मुंडक

दोन सुपर्ण परस्पर सख्य भावानें राहणारे व एकमेकाला कधींहि न सोडणारे (जीवात्मा – शिवात्मा) एकाच वृक्षाचा आश्रय घेऊन राहतात. एक त्या वृक्षाच्या गोड फळांचा आस्वाद घेऊन उपभोग घेतो व दुसरा उपभोग विरहित साक्षी मात्र असतो. हा झाला नेहमींचा अर्थ.

येथें वृक्ष या शब्दाचा अर्थ ब्रह्म असा आहे. या सूक्ताच्या आठव्या व नवव्या ऋचांत --'किंस्विद्वनं कउस वृक्ष आसीत्' असा प्रश्न व त्याचें उत्तर 'ब्रह्मवनं ब्रह्म स वृक्ष आसीत्' असा उलगडा केला आहे. ब्रह्म हें सदोदित आनंदमय, प्रेममय असतें. ह्या ब्रह्मानंदाच्या अधिष्ठानावर जीव शिवाचें युग्म एकमेकाला कधींहि न सोडतां अत्यंत सख्यभावानें, प्रेमानें नांदत असतें. त्यापैकीं एक 'पिप्पलं स्वादु–अत्ति' म्हणजे प्रेमांतून निर्माण होणाऱ्या रति सुखाचा (पिप्पलं Sexsual enjoyment) उपभोग घेत असतो व दुसरा कर्मांचा अध्यक्ष असल्यामुळें त्या रतिसुखांतून उत्पन्न झालेल्या कर्मफळाचें अनासक्तीनें व खेळीमेळीनें सुव्यवस्थित नियंत्रण करीत असतो.

— श्वेताश्वतर०

कर्माध्यक्ष म्हणजे कर्माचें लीलेनें नियंत्रण करणारा व साक्षी म्हणजे निगा राखणारा, काळजी घेणारा असा अर्थ आहे.

## कबीर–

तरवर एक मूल बिन ठाडा, बिन फुले फल लागे।
साखा-पत्र कछू नहिताके, सकल कमल-दल गाजै।
चढ तरवर दो पंछी बोले, एक गुरु एक चेला।
चेला रहा सो रसचुन खाया, गुरु निरंतर खेला ॥
पंछीके खोज अगमपरगट, कहैं कबीर बड़ी भारी।
सब ही मूरत बीज अमूरत, मूरतकी बलि हारी ॥

'सयुजा सखाया' म्हणजे ही जीव-शिवाची किंवा सतासताची जोडी 'जिये प्राणेश्वरीवीण। शिवीहि शिवपण थारो न शके' या श्रीज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें तीं आत्यंतिक प्रेमामुळें एकमेकाशीं इतकीं संलग्न झालेलीं असतात कीं त्यांची जोडी फुटणें शक्य नाहीं; आणि यांत गंमत अशी कीं, शिवानें आपल्या प्राणेश्वरीला उत्पन्न केलें व प्राणेश्वरीनें 'सर्व शून्याचा निष्कर्षु। जियाबाइला केला पुरुषु'। किंवा नाथांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'पति जन्मला माझे उदरीं। मी झाले तयाची नोवरी' असे हे दोन सुपर्ण एकाच ब्रह्मवृक्षाच्या आश्रयाला राहून 'विषो एक एकाची जिये। एकमेकांचे विषयीं इये। जिये दोघे सुखियो जिया दोघा' ॥ एकमेकांच्या भोगद्वारा प्राप्त होणाऱ्या स्वस्वरुपभूत सुखानें सारखीच सुखावलेलीं, समाधान पावलेलीं किंवा तृप्त झालेलीं असतात.

ऋग्वेद टीकेंत सायणाचार्य म्हणतातः– पति-पत्नि किंवा नवरा-बायको हे एकाच वस्तूचे समसमान असे अर्धे भाग आहेत. श्रीज्ञानेश्वर आपल्या मंगलाचरणांत म्हणतातः– 'सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः। ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ॥ द्वैताच्या देखाव्यामुळें शिवशक्ति ही एकमेकाशीं संलग्न झालेलीं आहेत, असें जरी वारंवार दिसतें, तरी पण समानरूप असें जें शिवतत्त्व, त्यांत कोणतें अर्धे








कोणाचें व कोण कोणाच्या अर्धासहित आहे, हें समजणें कांहीं शक्य नाहीं.

'अन्य अभिचाकशीति' म्हणजे नुसता तटस्थ-रीतीनें पाहतो असा अर्थ नसून 'मय्याऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्'ची सर्व सुव्यवस्था –बृह० ३।८ मध्यें सांगितल्याप्रमाणें करतो.

'एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्याचंद्रमसौ विधृतौ तिष्ठत एतस्य अक्षरस्य प्रशासने गार्गि द्यावा पृथिव्यौ विधृते तिष्ठत अक्षरस्य प्रशासनें गार्गि निमेषा मुहूर्ता अहोरात्र्याण्यर्धमासा मासा ऋतवः संवत्सरा इति विधृतास्तिष्ठन्त्येतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि प्राच्योऽन्या नद्यः स्यन्दन्ते श्वेतेभ्यः पर्वतेभ्यः प्रतीच्योऽन्या यां यां च दिशमन्वेतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि ददतो मनुष्याः प्रशंसन्ति यजमानं देवा दर्वी पितरोऽन्वायत्ताः ॥

**याज्ञवल्क्य** गार्गीला म्हणतातः– खरोखर हे गार्गी! त्या अविनाशी तत्त्वाच्या आज्ञेनें सूर्य, चंद्र, पृथ्वी आणि आकाश, पळें, घटि, दिवस, रात्र, पक्ष, मास, ऋतु आणि संवत्सर पृथक्पणें राहूं शकतात. त्या अविनाशी परमात्म्याच्या आज्ञेनें बर्फाच्छादित पर्वतापासून कांहीं नद्या पूर्वेकडे आणि कांहीं पश्चिमेकडे स्वैरपणें वाहात जातात. याच्याच नियंत्रणानें मनुष्य दान देणारांची व देव यजमानांची प्रशंसा करतात. तसेंच पितर दर्वी होमाची प्रशंसा करतात.

प्रेम आणि आनंद यांतून निर्माण झालेला 'सतोबन्धुमसति'– हा जीव-शिवाचा संबंध आहे. 'सतोबन्धुमसति निरविन्दन्। हृदि प्रतीच्या कवयो मनीषा' म्हणजे साक्षात्कारी-ब्रह्मवृक्षाचें दर्शन झालेल्या ऋषींनीं आपले आपल्याच ठिकाणीं निश्चयानें आनंदांतून-प्रेमांतून उत्पन्न झालेली जिवाशिवाची जोडी पाहिली.

## श्री ज्ञानेश्वर

१ 'त्रिभुवनि आनंदु न माये गे माये।
आपे आपु परमानंदु वोसंडतु आहे ॥१॥
निवृत्ति गार्हस्थ मांडले आहे।
निःकाम आपत्य प्रसवत जाये ॥ २ ॥

२ आवो कमल नयनीं चांदिणे भासले।
तयामाजी एक निराकार देखिले ॥ १ ॥
हेंहि नव्हें तेहि नव्हें कांहीं नव्हें
तोचि पै होय ॥ ध्रु० ॥
बाप रखुमा देविवरू नव्हताचि पै झाला।
होऊनिया फावला फावो सरला ॥ २ ॥

३ चंचल चांदिणे सोमेवीण भासलें।
तेज निमाले रविबिंबेवीण ॥ १ ॥
जगत्रयजीवनु म्हणे जगासि कारण।
तें अणुप्रमाण तेथें दिसे ॥ ध्रु० ॥
बाप रखुमादेविवरू अणुप्रमाण भासला।
सगुणनिर्गुण झाला बाई येवो ॥ २ ॥

## मनसो रेत

असद्वा इदमग्र आसीत्। ततो वै सदजायत। तदात्मानं स्वयमकुरुत। तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति। यद्वैतत्सुकृत रसो वै सः। रसं ह्येवायं लब्ध्वाऽऽनंदी भवति। कोह्येवान्यात्कः प्राण्याद् यदेश आकाश आनन्दो न स्यात्। एष ह्येवानन्द याति। –तैत्तिरीय

यद्वैतत्सुकृतं रसो वै सः। हें जें आपलें आपल्याच ठिकाणीं जीवरूपानें प्रगट होणें, ह्याला सुकृत म्हणतात. व रसहि तेंच आहे. हें मनाचें रेत किंवा जीवाचें रेत होय. या रसामुळें आनंद निर्माण होतो; नव्हें रस हाच आनंद आहे, व हा रसच सर्व विश्वाचें बीज आहे. वरील **तैत्तिरीय श्रुतीचा अर्थ** देतों.

सत् रूप प्रगट होण्यापूर्वी परमात्मा आपल्याच ठिकाणीं पूर्णत्वानें होता. ह्या पूर्णत्वांतूनच सत् म्हणजे जीवात्मा उत्पन्न झाला. त्या पूर्णानेंच स्वतःला जीवरूपानें प्रकट केलें म्हणून त्याला 'सुकृत' म्हणतात. ह्या सुकृताला **रस** म्हणतात. ह्या रसामुळें जीव आनंद-युक्त होतो. चैतन्ययुक्त हें आनंद स्वरूप नसतें, तर हा ज्ञानविलास कसा दिसला असता? अर्थात् हाच परमात्मा सर्वांना आनंद देणारा आहे.

'यश्छन्दसामृषभो विश्वरूपः।
छन्दोभ्योऽध्यमृतात्संबभूव।
समेन्द्रो मेधया स्पृणोतु।
अमृतस्य देव धारणोभूयासम् ॥

जो वेदांमध्यें सर्व श्रेष्ठ आहे, विश्वरूप आहे, आनंद हाच ज्याचा छंद आहे, तो प्रधान रूपानें प्रगट झाला आहे. तो प्रणव स्वरूप परमात्मा (इंद्र–ॐ) सर्वांचा परमेश्वर मला धारणायुक्त बुद्धीनें संपन्न करो. (म्हणजे












मला माझ्या स्वरूपाचा कधींहि विसर न पडो). अमृतमय परमात्म्याची धारणा माझ्या हृदयांत सदा असो.

अशा तऱ्हेनें विद्वान् - क्रांतदर्शी अनुभवी संतांनीं व ऋषींनीं ध्यानयोगाच्या द्वारें जेथून सर्व विश्वाकार उत्पन्न होतो त्याचें बीज (निःसीम प्रेमामुळें व आनंदाच्या योगानें) प्रगट झालेलें (आत्मरूप) आपलें आपल्याच ठिकाणीं पाहिलें, प्रत्यक्ष अनुभविलें.

'तज्ज्ञाः पश्यंति बुद्ध्या परम
बलवतो माय याक्तं पतंगः।
बुद्धावंतः समुद्रे प्रतिफलित
मरीच्या स्पंद वेधसस्तम्।
यादृग्यावानुपाधिः प्रतिफलति
तया ब्रह्मतस्मिन्यथास्यं।
प्राप्ता दर्शानुरूपं प्रतिफलति
यथावस्थितं तत्सदैवम्॥'

—शतश्लोकी श्री शंकराचार्य

शास्त्रज्ञ पुरुष तो अत्यंत बलवान अशा हिरण्यगर्भाच्या मायेनें मोहित झालेला जीव बुद्धिरूप समुद्रामध्यें प्रतिबिंबित झालेलें आत्म्याचें जें स्वरुप आहे, तें निश्चयात्मक अन्तःकरण वृत्तीनें पाहतात. जसें समोर आलेल्या आरशामध्यें मुख प्रतिबिंबित होतें तें मुख स्वतःतर सर्वदा जसेंच्या तसेंच असतें. तसेंच जेवढ्या प्रमाणाची व जशा प्रकारची उपाधि असेल तसेंच तें ब्रह्म प्रतिबिंबित होतें.

'पतनशीलः पतंगोजीवः' ऋग्वेदश्रुति. 'पतंगमक्तमसुरस्यमायया हृदापश्यंतिमनसा विपश्चितः। समुद्रेण अंतः कवयो विचक्षते मरीचीनां पदमिच्छंतिवेधसः॥ बुद्धिरूप समुद्रामध्यें सच्चिदानंदस्वरुप परमात्मा प्रतिबिंबित होतो. त्यालाच त्या परमात्म्याच्या दुर्लंघ्य मायेनें मोहित झाल्यानें जीव असें नांव प्राप्त होतें. तो पतंग होय. कारण स्वरुपापासून भ्रष्ट होणें हा त्याचा स्वभावच आहे. सारांश जीव त्या परमात्म्याच्या प्रतिबिंबभूत आहे असें शास्त्रज्ञ पुरुष निश्चयात्मक बुद्धीवृत्तीनें पाहतात.

'तिरश्चिनो विततो रश्मिरेषाम्।
अधः स्विदासीदुपरि स्विदासीत।
रेतोधा आसन् महिमान आसन्
स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात्॥'

या ऋचेचा भावार्थ असा— भगवंताच्या स्वरुपांतच सर्वत्र सूक्ष्मापेक्षां सूक्ष्म व महतापेक्षा महत् अशा सर्व स्थिरचर वस्तू, नाना वर्णाच्या व त्याचप्रमाणें नाना आकृतींच्या उत्पन्न झाल्याचें दृश्य दिसत असतें.

**श्री ज्ञानेश्वर म्हणतातः—**

'कैसा मेळु आला गोडिये। दोघें न माती जगीं इये। कीं परमाणुमाजिही उवाये। मांडिली आहाति॥' एवढेंच नव्हे तर 'स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात्' म्हणजे 'हा ठावोवरी वियोगभेडे। जे बाळ जगा येव्हडे। वियाली परी न मोडे दोघुलेपण॥ आपुलिया अंगीं संसारा। दिखिलिया चराचरा। परि नेदि तीच तिसरा। झोंक लागो॥ असें हें स्वधाप्रयतिंचें जोडपें एकत्र पाहावयास मिळतें. म्ह० त्याचा साक्षात्कार होतो. अशातऱ्हेनें साक्षात्कार होणें ही साधी गोष्ट नाहीं.

**कबीर म्हणतात—**

'कबीर यहु घर प्रेमका, खालाका घर नाहिं।
सीस उतारै हाथि करि, सो पैसे घरमाहि॥
कबीर निज घर प्रेमका, मारग अगम अगाध।
सीस उतारि पगतलिधरै, तब निकटि प्रेमका स्वाद॥

**श्री तुकाराम—**

'जीव दिला पायतळीं.'

—असो. अनुभवी ऋषींना जो ब्रह्मांडाच्या उत्पत्तिसंबंधी अनुभव आला तो असा :—

**श्वेताश्वतर—**

'ते ध्यानयोगानुगता अपश्यन्
देवात्मशक्ति स्वगुणैर्निगूढाम्।
यःकारणानि निखिलानि तानि
कलात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः।

त्यांना ध्यानावस्थेंत स्वगुणानें युक्त अशा भगवंताच्या स्वरूपभूत अचिंत्य शक्तीचा व भगवंताच्या ऐश्वर्याचा साक्षात्कार झाला. तो परमात्मा कालापासून आत्म्यापर्यंत सर्व कारण परंपरेचें नियंत्रण करीत असलेला त्यांनी पाहिला.

ब्रम्हांडाची उत्पत्ति क्रमानें होत नसून सर्व सृष्ट पदार्थांचा पसारा एकदमच उत्पन्न होत असतो.

**मुण्डक—**

'तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गा सहस्रशः प्रभवंते सरूपाः तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते॥'

हे प्रिय सोम्य! खरें तत्त्व असें आहे कीं ज्याप्रमाणें प्रज्वलित अग्नींतून त्याच्याच सारख्या हजारो ठिणग्या नाना प्रकारांनीं प्रगट होतात, त्याप्रमाणें ह्या अविनाशी अक्षर ब्रह्मापासून नाना प्रकारचे भाव निर्माण होतात.

### श्रीमद्भगवद्गीता–

'पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नाना विधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनिच ॥
पश्यादित्यान्वसून रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहुन्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥
इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्य द्रष्टुमिच्छसि॥ ११।५,६,७

या श्लोकावरच्या श्रीज्ञानेश्वरांच्या ओव्या अवश्य वाचाव्यात.

'आणि विश्वाही परौ ते ।
मानसीं जरी देखावे वर्तें ।
तरी इयेही विषयींचे कांहीं ।
एथ सर्वथा साकडे नाहीं ॥ '

म्हणजे ' जीव-शिवाचें, स्वधा-प्रयतीचें किंवा राधा-कृष्णाचें युग्म एकत्र पहावयास सांपडतें. ( स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् )

ऐश्वर्येंसी ईश्वरा । जियेचें अंग संसारा ।
आपणचि जे उभारा । आपणचि जे ॥
पतीचेनि अरुपपणें । लाजोन अंगाचें मिरवणें ।
केलें जगा येवढें लेणे । नाम रूपांचें ॥
जियेचेनि अंगलगे । आनंद आपणया आरोगू लागे ।
सर्वभोक्तृत्वहि नेघे । जियेवीण कांहीं ॥
जया प्रियाचें जें अंग । जो प्रियुचि जियेचें चांग ।
कालवोन दोनी भाग । जेविते आहाति ॥
जिया दोघे आरिसे । जिया दोघा ॥ – अमृतानुभव

'कामस्तदग्रे पासून स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात्' पर्यंत हा काम म्हणजे प्रेम-प्रीतीनें घोळल्यामुळें, अथवा रसीं रस मुरल्यामुळें प्रेमाचें स्फुंदन सुरू झालें; त्यामुळें सहज आत्मरूपामध्यें रूप रंगलें व निर्गुणाच्या बाजेवर सगुणाची सेज घालून हें जगायेवढें बाळ त्यावर सहज थोरावून खेळावयास लागलें.

या स्थितीचें वर्णन अनुभव असल्याशिवाय कळणें कठीण आहे.

### कबीर

हम वासी उस देशके, जहाँ बारह मास विलास ।
प्रेम झरे विकसैं कँवल, तेजपुंज परकास ॥
हम वासी वा देशके, जहाँ पारब्रह्मका खेल ।
दीपक जरै अगम्यका, बिन बाती बिन तेल ॥
बेहद अगाधी पीव है, ये सब हदके जीव ।
जे नर राते हद्दसों, ते कदी न पावें पीव ॥
हदमे पीव न पाइये, बेहदमे भरपूर ।
हद बेहदकी गम लखै, तासो पीव हजूर ॥
हद्द छांडि बेहद गया, रहा निरंतर होय ।
बेहदके मैदानमें, रहा कबीरा सोय ॥

### श्री एकनाथ

अनुभवाची खूण नेणता, निपुण बुडाले संसार डोही ।
स्वकर्माचरण मत्ताचें विवरण, परमात्मा न पडेचि ठाईं॥
एकाजनार्दनी अनुभवी तो जाणे सर्वेश्वर याच देही ।ध्रु.।
येथें वेदासी बोबडी । अनुभवी पैल थडी ।
एका जनार्दनी गोडी । नित्य घेतसे ॥ श्री एकनाथ.

वेदान्त पारंगत व आमनिष्ठ अशा संतांनीं आपल्या तीक्ष्ण व सूक्ष्म दृष्टीनें जें पाहिलें किंवा स्वतःचे ठिकाणीं जें त्यांना अनुभूत झालें तें हें :– सतो बन्धुमसति निरविंदन् । हृदि प्रतीच्या कवयो मनीषा । रेतोधा आसन् महिमान आसन् । स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् ॥

### कबीरः–

साधो, ब्रह्म अलख लखाया । जब आपआप दरसाया ।
बीज–मद्ध ज्यों बृच्छा दरसै बृच्छामद्धे छाया ॥
जो नभमद्धे–सुन्न देखिये, सुन्न अनन्त आकारा ।
निःअच्छरते अच्छर तैसे अच्छर छर बिस्तारा ॥
ज्यों रविमद्धे किरन देखिये, किरनमद्धे परकासा ।
परमातममें जीव ब्रम्ह इमि, जीवमद्ध तिमि स्वाँसा ॥
स्वाँसामद्धे शब्द देखिये, अर्थशब्दके माही ।
ब्रम्हते जीव जीव ते मनयों, न्यारामिला सदाही ॥
आपहि बृच्छबीज अंकूरा, आप फूल फल छाया ।
आपहि सूर किरन परकासा, आपब्रम्ह जिऊ माया ॥
अनन्ताकार सुन्ननभ आपै, स्वाँसशब्द अरथाया ।
निःअच्छर अच्छर छर आपै, मनजीव ब्रम्ह समाया ॥
आतममे परमातम दरसै, परमातममे झाँई ।
झाँईमें परछाई दरसै, लखै कबीरा साँई ॥



अनुक्रमणिका






## सूक्तकाराचा व संतांचा अनुभव तोच

या नासदीय सूक्ताचा ऋषि परमेष्ठि प्रजापति जसा स्वतःचा स्वानुभव सांगतो, तसाच तुकाराम, कबीर वगैरे पूज्य संत हेहि तोच अनुभव सांगतात. त्या स्थितीला पोहोंचलेल्या सत्पुरुषांचा अनुभव एकच असतो. श्रीतुकाराम म्हणतात 'नव्हे आधींचें मधींचे। आम्ही देवांहि आधीचे ॥ जे जे झालें अवतार। तुका त्यांचे बरोबर ॥ त्याचप्रमाणें कबीर म्हणतातः—

जहिया किरतम ना हता, धरती हती न नीर।
उतपति परलय ना हता, तबकी कहैं कबीर ॥

कबीरांनीं नासदीय सूक्ताचा अनुभव थोडक्यांत पण मजेदार रीतीनें कसा सांगितला आहे पहा :

'करत कल्लोल दरियावके बीचमें,
ब्रह्मकी छौलमें हंस झूलै।
अर्ध औ, ऊर्ध्वकी पेंग बाढ़ी तहाँ,
पलट मन पवनको कँवल फूलै ॥
गगन गरजै तहाँ सदा पावस झरै
होत झनकार नित बजत तूरा।
बेद-कत्तेबकी गम्म नाहीं तहाँ
कहै कब्बीर कोई रमै सूरा ॥
गगनकी गुंफा तहँ गैबका चाँदना,
उदय और अस्तका नाम नाहीं।
दिवस और रैन तहँ नेक नहि पाइये,
प्रेम-परकासके सिन्धु-माहीं ॥
सदा आनन्द दुख-दंद व्यापै नहीं,
पूरनानन्द भरपूर देखा।
भर्म और भ्रान्ति तहँ नेक आवै नही,
कहै कब्बीर रस एक पेरवा ॥

परमात्म्यानें आपल्या स्वरूपभूत शक्तीच्या योगानें जेव्हां अनंत विश्वें निर्माण करून रसमयी लीलेला सुरवात केली त्यावेळेस ह्या कामानें— लीलामयरसानें— कशी गम्मत करून सोडली ती पहा :

## श्री एकनाथ अष्टपदी—

'वाकडा म्हणे कृष्णाजी बापा
मी एक देखिलें भूतेरे।
त्याचें विष जळुनी गेले
शेष राहिलें किंचित रे॥
देहावीण छळितो तेथेचि पीडितो
त्या ठाया असे मलमूत्र रे।
त्यांनी जिंकिले कोंण कोण ते
त्यासी जिंकील कोणता रे॥
घोंगडे माझें बोलणें कान्हाबो
घोंगडे माझें बोलणें॥ ध्रु० ॥
जुनाट जोगडा काळाचा काकडा
डोंगरी राहतो भोंडारे।
झडपिला हावे नागवाचि धांवे
पाठीसि लागला भिल गोंडा रे॥
कर्दळी खोपा नेटका रूपा
पाहुनि भुलला तोंडारें।
जग अंधारीं महाभ्यासुरी
अपार चालिला वीर्याचा लोंढारे॥
कुल्लाळ हाडाचा बापच हाडाचा
अखंड घडतो मडकीरे।
त्यासी एकभूत संचार झाला
हिमालयाच्या खडकीरे॥
भूतवैऱ्याची नोवरी पाहुनि
जिवास भरली धडकीरे।
कोणी एके वेळीं पाठीशी लागला
भेडसाविती लेक लाडकीरे॥
नगाचे दंदी नगाचि खांदी
अति हाडाचा ढेंगारे।
त्यासी एकभूत संचार जाहला
येऊनि जडला अंगा रे॥
सुत अंधाचा परांगनेचा
चिरे फेडितो कां गा रे।
त्यासी एक वृक्ष पुढें भेटला
डांगानें मोडिला टांगा रे॥
गंगा माझारी संग ढीवरीसी
रमला तपो गर्वे रे।
त्यासी एक पुत्र जळीं जन्मला
त्यानें केलीं अठरा पर्वे रे॥
तो एक साक्षात् वेदोनारायण
बोलणें त्याचे बरवे रे।
कुरंगीचे पाडस दुबकिले
अयुध्यापुर मिळविले रे॥
डोळियाचे जळीं एक द्विज
जन्मला तेचि त्याचें वाहन रे।

बापा परिस एका तोंडानें
आगळा तारका केले हननरे ॥
शैल्यात्मजेच्या सवतीचा तनय
तुझ्या हाती त्याचें दहनरे ।
दिवा अंधारी जो कां रमला
नातवंड त्याचे गहनरे ॥
लंगोट बंध ढुंगासी शेपूट
अजून जीत काळ तोंडारे ।
रात्रींतून ज्यानें शेपूटी बांधोनि
संकटीं आणिला धोंडारे ॥
त्रिभुवन वासी तो देवऋषि
बाप जयाच्या तोंडारे ।

सोळा सहस्र नारी भोगुनी
ब्रह्मचारी तूं एक म्हणविसी लंडारे ॥
वाकडया आहाणा घातला जाणा
उकलील तो विरळा गतरे ।
पदापदाचा अर्थ करी जो तो
एक असे बहुश्रुतरे ॥
आठकडव्याची अष्टपदी गाइली
तो एक जाणा अद्‌भुतरे ।
एका जनार्दनी विनवीत असे
भूत नव्हे कान्होबाचा सूतरे ॥

---










प्रा. के. एफ्. चोरडिया

# प्राचीन हिंदी साहित्यांतील विभिन्न प्रवाह

साहित्य आणि समाज हे दोन शब्द परस्पराशी निगडित आहेत. जें राष्ट्र प्रगत असतें त्या राष्ट्राचें साहित्यहि विकसीत असतें. पराधीन मागासलेल्या राष्ट्रांतील साहित्य हें अविकसीत आणि हीन दर्जाचें असतें. जसजसा समाज बदलतो तसतसें साहित्यांतहि परिवर्तन होतें. जगांतल्या सर्व भाषांतील साहित्यांत हा बदल आढळून येतो.

मराठी साहित्याचा वैभवशाली आदिकाल ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ यांच्या काव्यानें मंडित झालेला आहे. या कवींनीं साहित्यरचना ही परमेश्वराच्या भक्तीसाठी केली. ' वेडेवाकुडे गाईन, परी तुझा म्हणवीन ' ही त्यांची वृत्ति होती. मुद्दाम प्रयत्न न करताहि त्यांचें काव्य श्रेष्ठ साहित्याचें अंग बनलें हा भाग वेगळा परंतु त्यांनीं पांडित्य-प्रदर्शनाचा प्रयत्न कधीहि केला नाही. पुढे पंडिताचें युग आलें. मोरोपंत, वामनपंडित यांनीं आपलें पांडित्य दाखविण्यासाठीं अनेक प्रकारची शाब्दिक कसरत केली. या पंडितानींहि देवादिकांच्याच कथा गाईल्या परंतु मराठी राज्याच्या वैभवाबरोबर शृंगाररसाला साहित्यांत प्रथम स्थान मिळालें. ' सुंदरा मनामध्यें भरली ' अशा प्रकारच्या लावण्या रचल्या जाऊं लागल्या. शाहिरांनीं वीर मराठा सैनिकांना उत्तेजन देण्यासाठी पोवाडेहि रचले.

इंग्रजी राज्याच्या उदयानंतर गद्याचाहि उदय व विकास झाला. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं स्वराष्ट्र, स्वजाति, स्वधर्म यांच्या अभिमानाचे धडे आपल्या निबंधमालेंतून दिले तर आगरकरांनीं सुधारकांतून समाजांतील जुन्या रूढीवर हल्ला चढविला. केशवसुतांनीं काव्यांतून सुधारणेची तुतारी फुंकली. तेथपासून मराठी साहित्य-सरिता अनेक वळणें घेत नवकाव्य, नवकथापर्यंत पोहोचली आहे.

हा प्रकार जसा मराठी साहित्यांत आढळतो त्याचप्रमाणे हिंदी साहित्यांतहि विभिन्न प्रवाह दिसतात. इसवी सनाच्या आठव्या नवव्या शतकापासून आजपर्यंतच्या प्रवासांत ह्या साहित्यानें अनेक निरनिराळीं वळणें घेतलेलीं आहेत. मराठीच्या मानानें हिंदीचें क्षेत्र विशाल असल्यानें ह्या वळणांत अनेक प्रकार आढळतात.

हिंदी साहित्याची सुरुवात आठव्या शतकापासून होते. या काळांत जैन, बौद्ध व नाथ या तीन संप्रदायांतील विद्वान संतानीं व इतर लेखकांनीं अपभ्रंश भाषेंत साहित्यरचना केली. ह्या अपभ्रंशांत हिंदीचीं बीजें ठिकठिकाणी विखुरलेलीं दिसतात; तथापि अद्याप दऱ्याखोऱ्यांतून वहाणाऱ्या लहानशा निर्झराप्रमाणें त्याचें स्वरूप होतें. हें भाषेच्या संक्रमणकाळांतील साहित्य होतें.

इ. सनाच्या ९व्या १०व्या शतकांत राजस्थानांत अनेक लहानमोठीं रजपूत राज्यें विखुरलेलीं होतीं. याचवेळीं वायव्येकडून मुसलमानांच्या स्वाऱ्या भारतावर सुरू झाल्या होत्या. त्या धाडीला रोखण्याचा रजपुतांनीं आटोकाट प्रयत्न केला. स्वधर्म, स्वराज्य यांच्या रक्षणासाठी रजपूत वीर जीवावर उदार होऊन लढत व युद्धांत पराभव झाल्यास वीर रजपूत रमणी धगधगत्या अग्निकुंडांत उड्या घेऊन जोहार करीत. अशा या वीरतेनें भरलेल्या कथा काव्यांतून गुंफण्यास अनेक राजपूत भाट पुढें सरसावले. हिंदीचें हेंच खऱ्या अर्थानें आदिकालीन साहित्य आहे.

## ' पृथ्वीराज रासो '

या काळांतील सर्वश्रेष्ठ ग्रंथ ' पृथ्वीराज रासो ' असून त्यांत शृंगार, वीर हे दोन रस मुख्य आहेत. या काव्यांत दिल्ली व अजमेरचा पराक्रमी राजा पृथ्वीराज चव्हाणाची गाथा आहे. या महाकाव्याचा लेखक चंदबरदाई हा पृथ्वीराजाचा सखा व मंत्री होता. पृथ्वीराजाचें सर्व जीवन त्यानें अगदी जवळून पाहिलें असल्यानें संयोगिता अपहरण, पृथ्वीराजाची शहाबुद्दिनाबरोबर झालेलीं युद्धें वगैरे त्याच्या जीवनांतील अनेक लहानमोठ्या घटनांचें त्यांत वर्णन आहे. या ग्रंथाप्रमाणेच विजयपाल रासो, खुम्माण रासो, बीसलदेव रासो, जयचंद्र प्रकाश इत्यादि इतर ग्रंथहि ह्या काळांत रचले गेले परंतु या काळांतील लोकप्रिय काव्य आल्हाखंड आहे. या काव्यांत आल्हा व उदल ह्या दोन वीरांची कथा इतक्या सुंदर रीतीनें मांडली आहे कीं, त्यानें लोकांना अगदी वेडें केलें. आजहि राजस्थान व बुंदेलखंडांत पावसाळ्याचे दिवस आले कीं, ढोल वाजूं लागतो व लोक रिंगण धरून कानावर हात ठेवून जोरजोरानें हीं गीतें गातात.

## संतकवि

राजपूतांनीं शर्थ करूनहि ते मुसलमानांना थोपवूं शकले नाहींत. उत्तर भारतांत मुसलमानांचें राज्य स्थापन झालें. वीररसयुक्त गीतांना नंतर स्थान राहिलें नाहीं. सामान्यतः अशा स्थितींत पराभूत झालेलीं माणसें देवाकडे वळतात परंतु डोळयादेखत महंमद गजनीनें अनेक मूर्ति फोडल्या होत्या. स्वयंभू मानल्या गेलेल्या सोमनाथाचीहि काठीच्या प्रहारानें शकलें केलीं होतीं. तेव्हां मूर्तीवर विश्वास कसा बसावा ? त्यामुळें या काळांत निर्गुण, निराकार अशा परमेश्वराची उपासना होऊं लागली. कबीर ह्या काळांतले प्रमुख संत व कवि होते. त्यांनीं हिंदू मुसलमानांची एकी करण्याचा प्रयत्न केला व दोन्ही समाजांतील वाईट रूढींचा कडाडून विरोध केला. मुल्ला मोठ्यानें बांग देतो त्यास उद्देशून ते म्हणतात ' तूं मोठ्यानें कां ओरडतोस ? खुदा बहिरा आहे काय ? रोजासंबंधीहि —

' दिनभर रोजा रखत है, रात हनत है गाय। '

असा उपहास त्यांनीं केला आहे. मूर्तिपूजेला विरोध करतांना ते म्हणतात —

" पाहन पूजे हरि मिले. तो मैं पूजूं पहाड।
ताँते ये चक्की भली, पीस खाय संसार " ॥

दगडाची पूजा केल्यानें जर देव भेटत असेल तर पहाडाचीच पूजा करावी. त्यापेक्षा जातें बरें, निदान दळायच्या तरी कामास येतें.

कबीराप्रमाणेंच नानक, दादू, रैदास, धर्मदास, मलूकदास, सुंदरदास आदि संतांनीं निर्गुण भक्तीचा पुरस्कार केला. गुरु नानकानें हिंदू मुस्लीम ऐक्याचा प्रयत्न केला त्यांतून नवीन ' शीख ' धर्माचा उदय झाला. ह्या संतांनीं भक्तीचा मार्ग सामान्य जनतेला सोपा केला. त्यांनीं क्रियाकांड, जातिभेद आणि अंधविश्वासाचें जोरांत खंडन केलें. त्यामुळें सामान्य जनता त्यांचेकडे आकर्षिली गेली परंतु समाजांतील उच्च वर्गांतील लोक त्यांच्यावर चिडूनच होते व त्यांनीं त्यांची उपेक्षा केली.

संतांना जगाचा चांगलाच अनुभव होता. निरनिराळ्या भागांत फिरल्यानें त्यांना समाजाच्या सुखदुःखाचें आकलन झालें होतें. त्यांचें काव्य हें सामान्य जनासाठी असल्यानें त्याची भाषा सोपी आहे. परंतु कांहीवेळा नाथपंथीयाच्या प्रभावानें त्यांनीं अनेक चमत्कारिक गोष्टी गहन भाषेंत मांडल्या आहेत. तथापि सामान्यतः अनेक व्यवहाराच्या व नीतीच्या गोष्टी त्यांच्या काव्यांत आहेत. कबीराचे दोहे ह्या दृष्टीनें विशेष प्रसिद्ध आहेत.

## सुफी पंथाचें साहित्य

ज्यावेळी कबीर, नानक आदि संत निर्गुण भक्तीचा प्रचार करीत होते, त्याचसुमारास कुतुबन, मंझन, जायसी, उसमान, कासिम, नूर महंमद, फाजिलशाह,

शेख नबी इत्यादि सूफी संत प्रेममार्गाचा प्रचार करीत होते. परमेश्वराची प्राप्ति त्याच्यावरील प्रेमामुळेंच होऊ शकेल. त्या प्रेमांत पागल होणें हाच त्याच्या प्राप्तीचा मार्ग आहे अशी सूफी पंथाची विचारसरणी आहे. ह्या फकीरांनीं काल्पनिक ऐतिहासिक कथा रचून त्यांत ईश्वरोन्मुख प्रेमाच्या छटा दाखविल्या आहेत. अशा ह्या कथामध्यें जायसीचा ‘पद्मावत’ ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. ह्या महाकाव्यांत चितोडच्या पद्मिनीच्या ऐतिहासिक कथेंत बराचसा काल्पनिक भाग मिसळून एक सुंदर कथा गुंफण्यांत आली आहे, व त्यांतून सूफी मताचे सिद्धांत मांडण्यांत आले आहेत. हे फकीर परदेशांतील असूनसुद्धा त्यांनीं भारतीय विचारसरणींतील बराचसा भाग उचलला होता. इतकेंच नव्हे तर कबीर, दादू आदि संतांनीं समाजांतील जुनाट रूढींवर कोरडे ओढले आहेत परंतु सूफी फकीरांनीं मात्र त्याबाबत अक्षरहि काढलें नाहीं.

## तुलसीदास

निर्गुण भक्तीच्या प्रचारानंतर हिंदी साहित्यांत पुन्हा सगुण भक्तीची लाट पसरली. सामान्य जनांचें समाधान निर्गुण, निराकार अशा परमेश्वरानें होत नाहीं. त्यांच्या डोळ्यापुढे परमेश्वराचें प्रतीक हवें असतें. तेराव्या शतकांत दक्षिणेंत वैष्णव भक्तीचा प्रसार होत होता. रामानुजाचार्य व वल्लभाचार्य ह्यांनीं ती भक्ति उत्तरेकडे नेली. रामानुजाचार्यांचे शिष्य रामानंद होते. त्यांनीं रामभक्तीचा प्रचार केला परंतु रामभक्तांतील सर्वश्रेष्ठ कवि तुलसीदास होत. ते केवळ रामभक्तांतीलच नव्हे तर हिंदी साहित्यांतील मुकुटमणी आहेत. त्यांचें रामचरितमानस हें हिंदींतील सर्वश्रेष्ठ महाकाव्य आहे. रामचरित मानसांत रामायणाची कथा आहेच परंतु त्याबरोबर आदर्श राजा, मातापिता, बंधु, समाज ह्यांचेंहि विवेचन केलें आहे. त्यामुळें हा ग्रंथ उत्तर भारतांतील समाजव्यवस्थेचा आदर्श बनला आहे. उत्तर भारतांत आजहि घरोघर विद्वानापासून तों अशिक्षित शेतकऱ्यापर्यंत सर्वजण त्याचीं पारायणें करतात, एवढेंच नव्हे तर उत्तर प्रदेशांतील भय्या कोठेहि गेला तरी आपल्याबरोबर तुलसीदासांचें रामायण घेऊन जातो व रोज त्यांतील कांही पानें वाचल्यावर मगच आपल्या दैनंदिन कार्याला सुरुवात करतो. इतका लोकप्रिय हा ग्रंथ आहे. ह्या ग्रंथाच्या लक्षावधी प्रति खपल्या असून त्याचा प्रचार सारखा वाढतच आहे. तुलसीदासांनीं ह्या ग्रंथांत रामाच्या ओजस्वी, लोकरक्षक, मर्यादापालक आणि धर्मसंरक्षक रूपाचें चित्रण करून मुसलमानांच्या अत्याचारानें पीडलेल्या पराभूत मनोवृत्तीच्या हिंदूनां नवीन उत्साह दिला. उत्थानाचा मंत्र दिला. तुलसीदासांनीं रामयणाशिवाय आणखी विनयपत्रिका, जानकी मंगल, रामलीला नहछू, कवितावली, कृष्ण गीतावली, सतसई, दोहावली अशा एकूण १२ ग्रंथांची रचना केली. तुलसीदासाखेरीज रामकाव्य लिहिणारे इतरहि कवि झाले. त्यामध्ये केशवदास प्रमुख आहेत. केशवदास हे खरें म्हणजे पंडित कवि आहेत. तुलसीदासाप्रमाणे केवळ भक्ति हाच त्यांचा उद्देश नव्हता. त्यांनीं रामचंद्रिका हा ग्रंथ लिहिला. रामभक्तीची परंपरा आजहि चालू आहे. आधुनिक कवींतील श्रेष्ठ असे कवि ‘मैथिलीशरण गुप्त’ यांनीं रामायणावर आधारलेले ‘साकेत’ हें महाकाव्य व ‘पंचवटी’ हें खंडकाव्य लिहिलें आहे परंतु एकंदरीत पहातां रामायणावर हिंदींत फारसी काव्यरचना झाली नाही. तुलसी रामायणाचें नेत्रदीपक यश हें त्याचें एक कारण आहे. तुलसीदासांनीं इतकी उत्कृष्ठ रचना केली असतांना आतां रामायणावर काव्य करणें म्हणजे सूर्यापुढे काजवा उभा करण्यासारखें कवींना वाटलें. याशिवाय शृंगारासारख्या प्रमुख रसाला रामायणांत विशेष स्थान नसल्यानें कवींना त्याचें विशेष आकर्षण वाटलें








नाहीं. याउलट केवळ शृंगाराच्या प्रचुरतेमुळेच कृष्णकथेवर अनेक काव्यें झालीं.

## सूरदास व मधुराभक्ति

कृष्णकथेंतील शृंगारामुळें अनेक कवि तिकडे वळले. संस्कृत साहित्यांत जयदेवांनीं रचलेल्या गीतांचें अनुकरण विद्यापतीनें हिंदीत केलें. विद्यापतीचीं गीतें इतकीं लोकप्रिय झालीं कीं, तीं म्हणत असतांना बंगालमधील प्रसिद्ध संत चैतन्य महाप्रभु बेहोष होत. विद्यापति स्वतः शेष होते. कृष्णाविषयी त्यांना भक्ति नव्हती. ह्या विषयावर भक्तीपुर काव्य वल्लभाचार्यांच्या संप्रदायांतील कवींनी केलें. सूरदास कृष्ण भक्तकवीमध्यें प्रमुख होते. त्यांचा 'सूरसागर' वात्सल्य आणि शृंगार रसाचा अपूर्व ग्रंथ होय. सूरदासांच्या ह्या ग्रंथामुळे :

"सूर सूर तुलसी शशी। उडुगण केशवदास।
अबके कवि खद्योतसम। जह वह करत प्रकाश॥"

– असें एका कवीनें सूरदासाविषयी म्हटलें आहे. ह्याचा अर्थ असा कीं सूरदास हे हिंदी साहित्यांतील सूर्य आहेत तर तुलसीदास चंद्र आहेत. केशवदास हे नक्षत्रासारखे आहेत आणि अलीकडील कवि हे केवळ काजव्यासारखे आहेत. त्यांचा प्रकाश फक्त त्यांच्या अवतीभोवती पडूं शकतो. सूर्यचंद्राप्रमाणे सबंध जगाला प्रकाशित करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नाहीं.

हें म्हणणें थोडेसें अतिशयोक्तीचें असलें तरी त्यावरून सूरदासाचें श्रेष्ठपण लक्षांत येतें. परंतु सूरदासाला सूर्य म्हणण्याऐवजी चंद्र म्हणणेंच अधिक योग्य होईल, कारण सूरदासाच्या काव्याचे विषय चंद्रप्रकाशाप्रमाणेंच सौम्य व मधुर आहेत. कृष्णाच्या बालपणच्या खोड्या, त्याचें दूध दही चोरून खाणें, मुरलीवादनानें गोपींना मोहित करणें व मथुरेला गेल्यावर त्याच्या विरहामुळें गोपींचा विलाप एवढेच विषय सूरदासानें हाताळले आहेत. कृष्णानें अनेक असुरांना यमसदनास पाठविलें, महाभारतांत अर्जुनाचें सारथ्य करून त्यास जगाच्या नीतीचें रहस्य सांगितलें, परंतु कृष्णाच्या मधुर रूपाच्या भक्तींत अंध बनलेल्या ह्या कवीस तें कांहीं दिसलेंच नाही. तो कृष्णाच्या प्रेमांतच मस्त होता.

मधुराभक्तींत परमेश्वराला प्रियकर मानून भक्त त्याची प्रेयसी बनतो व उपासना करतो. सूरदास व अष्टछापाचे इतर कवि ह्यांची भक्ति किंवा पुष्टिमार्गांतील संतांची भक्ति ही अशाच प्रकारची आहे. सूफी संप्रदायांत भक्ति ही प्रेमांतच मानली आहे. परंतु त्या ठिकाणी परमेश्वराला प्रेयसी मानून भक्त प्रियकर बनतो व ज्याप्रमाणे मजनू लैलासाठी वेडा झाला तसा परमेश्वर प्राप्तीसाठी भक्त वेडा बनतो. भारतीय परंपरेंत पतीचें स्थान श्रेष्ठ असल्यानें परमेश्वराला पति मानणेंच योग्य दिसतें. राजस्थानची सुप्रसिद्ध कवयित्रि 'मीरा' ही स्वतःची विधवावस्था विसरून व सामाजिक बंधनें झुगारून देऊन कृष्णाच्या प्रेमांत मग्न झाली व मंदीरांत नाचूं गाऊं लागली.

'जाके सिर मोर मुकुट मेरा पति सोई।'

– असें म्हणून ह्या पतिपरमेश्वराच्या साधनेंत ती तल्लीन झाली. मीरेप्रमाणेंच मधुरा भक्तीचे उपासक सूरदास, कृष्णदास, परमानंददास, कुंभनदास, नंददास, चतुर्भुजस्वामी, छीतस्वामी आणि गोविंदस्वामी हे वल्लभाचार्यांचे आठ शिष्य होते. त्यांना अष्टछाप कवि म्हणतात. कृष्णाच्या ह्या भक्तीनें लोकांना इतकें वेडें केलें कीं, हिंदू कवींनीं तर राधा-कृष्णाच्या प्रेमाची कथा गाईलीच परंतु रसखान, रहीम, ताज, शेख इत्यादि मुस्लीम कवीदेखील कृष्णकथा गात नाचूं लागले.

हिंदीतील हें भक्तिपर साहित्य साधारणपणें इसवी सन १३२५ पासून १६५० पर्यंत निर्माण होत होतें. त्यानंतर भक्तीची लाट ओसरली व कवि शृंगारिक काव्यरचना करून स्वतःची उदरपूर्ति करण्यासाठीं राजांचें मनरंजन करूं लागले. इ. सनाच्या

१७ व्या शतकांत उत्तर भारतांत सगळीकडे मोगलांचें वैभवशाली राज्य होतें. राज्यांत सर्वत्र सुबत्ता व शांतता होती. ह्यामुळें मोगल दरबारांत विलासाचें वातावरण होतें. इकडे तिकडे विखुरलेले लहानमोठे हिंदु राजे होते तेथेहि मोगलांच्या प्रभावानें विलास सुरू झाला होता. मधुराभक्तींतील राधाकृष्ण प्रेमाचा आदर्श कवीपुढें होताच. ह्या काळांतील कवींनीं कृष्णाचें देवत्व उडवून देऊन राधा-कृष्ण प्रेमाची कथा एखाद्या निर्लज्ज कामुक नायक नायिकेच्या स्वरूपांत मांडली. कवींना स्त्रीसौंदर्यानें वेडें केलें व स्त्रीच्या अंगोपांगाचें वर्णन करण्याची त्यांच्यांत शर्यत लागली. शृंगार रसानें अश्लीलतेची पायरी गाठली परंतु तें काव्य लोकांना व कवींच्या आश्रयदात्या राजांना आवडत असल्यानें त्यांना त्याची खंत नव्हती. राजाच्या आश्रयाला राहिल्यानें आपलें पांडित्यप्रदर्शन करण्यासहि कवि सरसावले व काव्याचे लक्षणग्रंथ किंवा रीतिग्रंथ निर्माण झाले म्हणून ह्या काळास हिंदी साहित्याचा रीतिकाळ म्हणतात. ह्यास शृंगारकाव्य काल असेंहि म्हणतां येईल. ह्याची सुरुवात सुमारें १६५० इ. सनापासून झाली व तो १८५० पर्यंत टिकला.

## भूषण व वीररस

केशवदास, रहीम, भूषण, देव, बिहारी, पद्माकर, घनानंद हे रीतिकालांतील प्रमुख कवि आहेत. ह्यांतील भूषण कवि हा वीररसाकडे वळला. ह्याला हिंदू धर्म, हिंदू राज्य ह्याचा अभिमान होता. त्यानें शिवाजीमहाराज व बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल यांना आपल्या काव्याचें नायक केलें. शिवाजीनें मुसलमानांची दाढी उपटून हिंदूच्या डोक्यावर शेंडी लावली असें ह्या कवीनें म्हटलें आहे. शिवाजीचें वर्णन करतांना तो म्हणतो :

"तेज तम अंश पर। कान्ह जिमि कंस पर।
त्यों म्लेंछ बंसपर। सेर शिवराज हैं ॥"

ज्याप्रमाणे कृष्णानें कंसाचा नाश केला किंवा अंधकारावर प्रकाश विजयी होतो, त्याप्रमाणे म्लेंछ वंशीय राजापुढे शिवराज हा सिंहाप्रमाणे श्रेष्ठ आहे.

भूषण कवीखेरीज या काळांतील इतर सर्व कवि शृंगाराकडेच वळले. केशवदासाच्या रामचंद्रिकेचा उल्लेख वर आलाच आहे. त्याशिवाय त्यानें रसिकप्रिया, कविप्रिया, विज्ञानगीता, वीरसिंह देव चरित्र, जहांगीर जस चंद्रिका, रतन बावनी, नखशिख व रामालंकृत हे ग्रंथ रचिले. कविप्रिया व रसिकप्रिया या ग्रंथांत काव्याच्या छंद, लक्षण, रस व अलंकाराची चर्चा केली आहे. 'देव' कवि निरनिराळया राजांच्या आश्रयास होता व त्यानें भावविलास, अष्टयाम, प्रेमतरंग, प्रेमदीपिका, राधिका विलास, काव्यरसायन इत्यादि २७ ग्रंथांची रचना केली आहे.

रहीम हा अकबराचा मंत्री व सेनापति होता. त्यास 'खानखानान' अशी पदवी होती. त्यानें दोहावली, बरवै नायिका भेद, मदनाष्टक, शृंगार सोरठा इत्यादि ग्रंथांची रचना केली. रहीमचे दोहे विशेष प्रसिद्ध असून त्यांत व्यवहारनीति सांगितली आहे. कवि 'बिहारी' हा आमेर (जयपूर) चे महाराज जयसिंह यांच्या आश्रयास होता. हा राजा आपल्या नूतन पत्नीबरोबर विलासांत मग्न होऊन राज्याकडे दुर्लक्ष करूं लागला. सरदार व मंत्र्यांनीं पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु व्यर्थ. शेवटी बिहारीनें खालील दोहा रचून राजाकडे पाठविला :

"नहिं पराग, नहिं मधुर मधु,
नहिं विकास इहि काल।
अली कलीहीसो बिंध्यो,
आगे कौन हवाल ? ॥"

हे भ्रमरा, अजून कलीमध्यें पराग, मध कांही नाहीं. तिचा विकासहि झालेला नाहीं. तूं आताच जर इतका मग्न झालास तर पुढे काय होईल ?

सरदारांच्या अनेक वेळच्या सांगण्यानें जें झालें नाहीं तें बिहारीच्या एका दोह्यानें झालें. राजा पुन्हा आपल्या राज्यकार्याकडे लक्ष देऊं लागला, व त्यानें प्रसन्न होऊन बिहारीला एक हजार मोहरा दिल्या व त्यास अशा दोह्यांची रचना करण्यास सांगितलें. बिहारीनें असे ७०० दोहे रचिलें. थोडक्या शब्दांत अधिक अर्थ सांगण्याची कला बिहारीला चांगली अवगत होती म्हणून त्यास 'गाठरमें सागर' (घागरींत सागर) भरणारा कवि म्हणतात.

**तीन महत्त्वाचे प्रवाह**

अशा तऱ्हेनें हिंदीच्या प्राचीन साहित्यांत वीरकाव्य, भक्तिपर काव्य व शृंगारिक काव्य असे तीन प्रवाह स्पष्टपणे दिसतात, त्यांतील भक्तिपर साहित्यांत पुन्हा कबीर, नानक आदि संतांची निर्गुण ज्ञानाश्रयीं भक्ति, सूफी संतांची प्रेममार्गी भक्ति, तुलसीदास, केशवदासाचें रामभक्तिपर साहित्य व सूरदास, मीरा, अष्टछाप कवि ह्यांचें कृष्णभक्तिपर साहित्य असें चार उपप्रवाह आढळतात. हिंदीतील हें भक्तिपर साहित्य अतिशय संपन्न असून हा काळ हिंदी साहित्याचें सुवर्णयुग मानला जातो. अक्षरवाङ्मयांत गणना होण्यासारखें तुलसी रामायण, सूरसागर हे ग्रंथ याकाळांत निर्माण झाले. याशिवाय पद्मावत सारखें महाकाव्य, कबीराचे दोहे हें श्रेष्ठ साहित्य या काळांत निर्माण झालें. भक्तिकालाखेरीज इतर कालखंडापैकीं वीरकालांतील 'पृथ्वीराज रासो' व रीतिकालांतील 'बिहारी सतराई' यांची गणनाहि हिंदी गौरवग्रंथांत करावी लागेल.

हिंदीचें प्राचीन साहित्य बहुशः पद्यांत असून गद्यांत कांही थोडीशीं पत्रें व स्फुट चरित्रें सांपडतात. गद्याचा विकास हा आधुनिक काळांतील आहे. आधुनिक हिंदी साहित्यामध्येहि प्राचीन साहित्याप्रमाणेच अनेक विभिन्न प्रवाह आहेत. ह्या सर्व प्रवाहांनीं हिंदी साहित्याला निरनिराळया अंगांनीं समृद्ध केलें असून हिंदीचा विभिन्न दिशांनीं विकास केलेला आहे.












प्रा. पण्डित आवळीकर

# चंद्रात्मज रुद्र*

## प्रास्ताविक

चंद्रात्मज रुद्र हा मराठींतील एक चांगला पण उपेक्षित कवि आहे. मराठी महाभारतासंबंधीं लिहितांना त्याचा उल्लेख करणें अपरिहार्य व्हावें अशी कवि म्हणून त्याची थोरवी आहे.

कै. शं. श्री. देव, कै. गो. का. चांदोरकर आणि कै. ज. र. आजगांवकर या थोर संशोधकांनीं चंद्रात्मज रुद्रासंबंधीं थोडें फार लिहून ठेवलें आहे. कै. त्र्यं. गु. काळे यांनीं त्यांच्या 'समालोचकां'त या कवीसंबंधीं एक लेख लिहिल्याचें आजगांवकर सांगत असले तरी प्रयत्न करूनहि सदर लेख हातीं आला नाहीं.

उपरिनिर्दिष्ट मंडळींचा भर विशेषतः चंद्रात्मज रुद्राच्या काव्यावर दिसतो. त्याच्यासंबंधींची अधिक माहिती यापैकीं कोणास फारशी मिळालीहि नाहीं व त्यांनीं तसा प्रयत्नहि केलेला दिसत नाहीं. पूर्वसूरींच्या संशोधनाचा आढावा घेत कांहीं कविचरित्रविषयक नवीन माहिती देण्याचा हा प्रयत्न आहे. त्याच्या काव्यकृतीसंबंधीहि नवीन कांहीं सांगतां येईल असें वाटतें.

## कविनामाची चर्चा

कवि स्वतःचा सर्वत्र 'चंद्रात्मज' असाच उल्लेख करतो; व न चुकतां 'व्यंकटेश' हें गुरूचें नांव सांगतो.[१] माझ्याकडील त्याच्या कांहीं कृतींत तो अशींच नांवें देतो. 'उद्योगपर्वांत' तो स्वतःचें नांव 'चंद्रात्मज रुद्र' असें सांगतो.[२] यावरून, "यांसच 'रुद्र' म्हणत काय? कां हे भिन्न आहेत?" ही कै. चांदोरकरांची शंका[३] अनाठायीं वाटते. (यालाच 'रुद्रमुनि' म्हटल्याचें मीं पुढें सांगणार आहे.)

'चंद्रात्मज रुद्र' हेंच नांव मानल्यावर अनेक प्रश्न उपस्थित होतात. नांवांतील या दोन्ही पदांचा सूक्ष्म विचार आवश्यक ठरतो. चंद्रात्मज म्हणजे चंद्रा + आत्मज कीं चंद्र + आत्मज? कवीच्या वडिलांचें नांव 'चंद्र' असें होतें कीं आईचें 'चंद्रा' असें होतें?

या प्रश्नाचें उत्तर कवीनेंच देऊन ठेवलें आहे. आपल्या आईचें नांव 'वाराणसी' असल्याचें तो सांगतो.[४] आणि एका कन्नड कृतींत स्वतःचें नांव 'चंद्रनंदन' असें देतो.[५] "(चंद्रात्मज रुद्र) यांनीं 'उद्योगपर्वांत' आपल्या पित्याचें नांव 'दुंदुभी' दिलें आहे", हें चांदोरकरांचें विधान[६] गैरसमजावर आधारलेलें आहे.

ज्या ओवीचा[७] आधार चांदोरकर घेतात तिचा देवांनीं लावलेला अर्थच बरोबर असून 'चंद्र' हें त्याच्या (कवीच्या) पित्याचें नांव हें देवांचें मत[८]

---

* 'Studies in Education and Culture in honour of Shri. D. C. Pavate' या ग्रंथांतील 'A Marathi Follower of Kumara Vyasa' या माझ्या इंग्रजी लेखाचा हा विस्तृत अनुवाद आहे —लेखक.

१. महाराष्ट्र कवि चरित्र, भाग २ रा, पृ. ३८.
२. व्यंकटेश गुरुपदाचा रंक । चंद्रात्मज रुद्र नामक ॥ ...
३. संतकविकाव्यसूची, पृ. ३५.
४. माता वाराणसी देख । पवित्र आणि पतिव्रता ॥
५. (प) दरज चंद्रनंदन गोपितार्थव प्रगटिसिद कन्नडदि विनयदली.
६. संतकवि काव्यसूची, पृ. ३५.
७. जयाचा पिता आनकदुंदुभी । म्हणोनि गर्जे वेददुंदुभी ।
त्याचा कृपानुग्रह ग्रंथारंभीं । होता आरंभी कवित्वा ॥
८. श्री रामदासी संशोधन, खं. २, पृ. २६९–७०.








मान्य होण्यासारखें आहे. कारण आनकदुंदुभि म्हणजे वासुदेव व वासुदेव ज्याचा पिता त्या कृष्णाची कृपा झाल्यानें ग्रंथारंभ करतां आला; असा या ओवीचा अर्थ कोणासहि पटण्यासारखा आहे.

चंद्र हें कवीच्या पित्याचें नांव ठरल्यावर नुसतें 'चंद्र' असें नांव त्या काळीं रूढ होतें काय कीं 'रामचंद्र' या नांवाचा हा संक्षेप आहे ? दुसरीहि शक्यता गृहीत धरली पाहिजे. कारण 'रामचंद्रतनय' व 'रामचंद्रात्मज' अशींहि कविनामें आढळतात.[९] त्यांचा 'चंद्रात्मज' या नांवाशीं तरी निकटचा संबंध दिसतो. हा संबंध ताणावयाचाच झाला तर 'रामचंद्र' व 'रामचंद्रप्रभु' या कवींशीं[१०] जोडतां येणें शक्य असलें तरी इष्ट नाहीं.

'चंद्र' हें नांव कोठें आढळतच नसतें तर 'रामचंद्रा'कडे धांव घेणें अटळ होतें. एकनाथांच्या चरित्रांत एका 'चंद्रभटा'चा निर्देश आढळतो. एकनाथ व जनार्दनस्वामी तीर्थाटण करीत असतां 'चंद्रनामा द्विजवरा' च्या घरीं उतरले. 'चतुःश्लोकी भागवतावरील' त्याच्या रसाळ व्याख्यानामुळें एकनाथांस सदर ग्रंथावर टीका करण्यास जनार्दनस्वामींनी आज्ञा केली. अशी कथा स्वतः एकनाथ,[११] महिपति,[१२] भावे,[१३] आजगांवकर,[१४] व फाटक,[१५] यांनीं दिली आहे.

"पुढें 'चांदबोधला' या नांवानें ते (चंद्रभट) प्रसिद्धीस आले असें महीपतींनीं लिहिलें आहे... चंद्रभट तेच हे 'चांदबोधले' या गोष्टीस महिपतींच्या या लेखाशिवाय दुसरा आधार नाहीं." असें आजगांवकरांनीं स्पष्ट लिहिलें आहे. "जनार्दनपंत आडवळणीं जाऊन ज्या चंद्रभटाकडे चतुःश्लोकी भागवत ऐकतात व एकनाथांचे लिहिण्याप्रमाणें 'स्वानंदीं उत्पलित' होतात, व पुढें ज्या चंद्रभटाची समाधि राजदरबाराच्या प्रमुख ठिकाणीं बांधतात, तो कोणी साधा ब्राह्मण नसून ते चांदबोधलेच होते आणि हे शेखमहंमद व एकनाथांचा शिष्य मुकुंदराज सांगतात त्याप्रमाणें जनार्दनपंतांचे गुरु होते यांत शंका नाहीं." हें वा. सी. बेंद्रे यांचें म्हणणें[१६] विरुद्ध पुराव्यापुढें टिकणारें नाहीं. चंद्रात्मज रुद्राशीं, संबंध असूं शकणाऱ्या 'चंद्र' नांवाची चर्चा करतांना याहून अधिक खोलांत न शिरणें बरें.

'चंद्राजीपंत' असें नांव श्रीधरकवीच्या वंशावळींत आढळतें.[१७] चंद्र, चंद्रभट्ट आणि चंद्रकवि हीं नांवें[१८] कर्नाटकांत रूढ होतीं; हें आर. नरसिंहाचार्यांच्या वाङ्मयेतिहासावरून स्पष्ट होतें. यांतील चंद्र व चंद्रभट्ट हे १० व्या अगर ११ व्या शतकांइतके जुने असल्यामुळें आणि १५ व्या शतकांतील चंद्रकवि हा लिंगायत असल्याकारणानें चंद्रात्मज रुद्राशीं नांवापलीकडे त्यांचा कांहीं संबंध नाहीं. या साऱ्या चर्चेचा निष्कर्ष 'चंद्र' हें नांव तत्कालीं रूढ होतें, इतकाच आहे.

'रुद्र' हें कवीचें नांव. 'रुद्रोपंत' हें नांव बरेंच प्रचारांत होतें. 'रुद्र' नांवाचे कवीहि आढळतात. चंद्रात्मजास रुद्र म्हणत काय याबद्दल साशंक असणाऱ्या चांदोरकरांनीं "वर दिलेले चंद्रात्मज रुद्र ते हेच" असें एका 'रुद्रा' बद्दल म्हटलें आहे.[१९] तंजावर

---

९. A Descriptive Catalogue of the Marathi Manuscripts and Books (Saraswati Mahal). Vol. III, pages 255, 259, 278.

१०. Ibid, pages, 252, 254, 278, 282.

११. चतुःश्लोकी भागवत, ११७–१२१.

१२. भक्तलीलामृत, १४: २३–७६.

१३. महाराष्ट्र सारस्वत पृ. २५५–२५६.

१४. श्री एकनाथ महाराजांचें चरित्र, पृ. ३१.

१५. श्री एकनाथ वाङ्मय आणि कार्य, पृ. ७५.

१६. तुकाराम महाराज यांचे संतसांगाती, पृ. ८१.

१७. महाराष्ट्रसारस्वत, पृ. ५७२.

१८. History of Kannada Literature, pages, 2, 19, 22.

१९. संतकवि काव्यसूची, पृ. ९३.



अनुक्रमणिका








येथील सरस्वती महालांत 'रुद्र' व 'दासरुद्राजी' नांवाच्या कवींचीं पदें असल्याचें कळतें.[२०]

'उदासदास' या नांवापुढें, "चंद्रात्मज, चंद्रतनय ह्यांचें नांव उदास म्हणून होतें, त्यांचे हे शिष्य कीं काय?" अशी शंका चांदोरकरांनीं व्यक्त केली आहे.[२१] चंद्रात्मजांचें नांव 'उदास' होतें या म्हणण्याला त्यांनीं आधार दिलेला नाहीं. एका 'उदासा'चा 'श्रीसमर्थप्रतापांत' गिरिधरांनीं उल्लेख केला आहे.[२२] 'उदास' कवीबद्दल पुन्हां चांदोरकर बुचकळ्यांत पडतात:—"श्रीसमर्थ स्वतःस उदास, उदासदास वगैरे म्हणवीत असत तेच हे काय?" दास, उदास हीं समर्थांचीं नांवें असल्याचें गिरिधरहि सांगत असले[२३] तरी येथेंहि चांदोरकरांची प्रश्नव्याकुलताच व्यक्त होते. चंद्रात्मज (उदास), चंद्रात्मज, आणि रुद्र हे त्यांचे तीन कवि एकच आहेत; भिन्न नाहींत.

### कविचरित्रविषयक नवी माहिती

चंद्रात्मज रुद्राच्या स्थळ काळावर व जीवनावर 'देशिक चरित्रां'तील एक ओवी कांहींसा प्रकाश टाकते. ग्रंथारंभीं इतरांबरोबर हा चरित्रकार चंद्रात्मज रुद्राला पण वंदन करतो.[२४] त्यावरून– (१) चंद्रात्मज रुद्र हा शिवबोधाचा चुलतभाऊ होता; (२) अगाध लीला करणारा मुनि म्हणून प्रसिद्ध होता; आणि (३) तो 'विवेकसिंधू'चें नित्य श्रवण करीत असे; इतक्या गोष्टी कळतात.

'देशिकचरित्र' हें गोकाक तालुक्यांतील मुडलगी येथें होऊन गेलेल्या 'स्वामीं'चें चरित्र आहे. त्यासंबंधीं मी अन्यत्र विस्तारानें लिहिलें आहे.[२५] या स्वामींशी असणारा चंद्रात्मज रुद्राचा संबंध स्पष्ट करण्यासाठीं प्रथम स्वामींची वंशावळ देतोंः–

कोनेरिबोध
|
रंगबोध (१)
|
अद्वयबोध — पूर्णबोध

अद्वयबोध
|
शिवबोध (१)
|
रंगबोध (२)
|
शिवबोध (२)

'शिवबोध' हें नांव वंशावळींत दोनदां येतें. म्हणून (१) व (२) असे पुढे आंकडे घालून 'रंगबोधां' प्रमाणेंच दोन 'शिवबोधां'तील फरक दाखविला आहे. चंद्रात्मज रुद्र हे पहिल्या शिवबोधांचे चुलतभाऊ असतील काय? म्हणजे ते पूर्णबोधांचे पुत्र ठरतील.

'उद्योगपर्वा'च्या सद्गुरुस्तवनांत कवीनें वापरलेलें 'पूर्णचंद्रा' हें संबोधन शुद्ध रूपकात्मक आहे कीं तो पूर्णबोधांचा निर्देश आहे? 'बोधकला', 'बोधसुधा' हें शब्दहि असेच सूचक मानावयाचे कां?

पण 'पूर्णबोध' हें त्याच्या पित्याचें वा गुरूचें नांव मानणें शक्य नाहीं. कारण 'चंद्र' हें त्याच्या पित्याचें व 'व्यंकटेश' हें त्याच्या गुरूचें नांव असल्याचें निर्विवाद आहे. आणखीहि एक अडचण पूर्णबोध

---

२०. A Descriptive Catalogue of the Marathi Manuscripts And Book, Vol. III, pages, 112, 174.

२१. संतकवि काव्यसूची, पृ. ११.

२२. उदास नामा प्रेमळ दास। देशांतरीं ज्याचा वास।
लोटांगणी येत दर्शनास। सप्तऋषि दुर्गीहूनि अधिष्ठानीं॥ १०–४४॥

२३. श्रीसमर्थ प्रताप, २१–५.

२४. शिवबोधाचा चुलतबंधू। चंद्रात्मज रुद्रमुनी प्रसिद्धु।
ज्यांची लीला अगाधु। श्रवणविवेक सिंधु निरंतर॥ १–२०॥

२५. नवभारत, सप्टेंबर १९५८.

व पहिले शिवबोध यांचें गोत्र भारद्वाज[२६] तर चंद्रात्मजाचें गोत्र वसिष्ठहि[२७] आहे.

दुसऱ्या शिवबोधांचें गोत्र वसिष्ठ आहे. कारण दुसरे रंगबोध हे पहिल्या शिवबोधांचे पुत्र नसून जामात होत. या रंगबोधांचें मूळ नांव 'संगमनाथ' व गोत्र वसिष्ठ होय. गोत्राबरोबरच चंद्रात्मज रुद्राचें कुलदैवत[२८] जें 'संगमेश्वर' तेंच या दुसऱ्या रंगबोधांचें असलें पाहिजे हें 'संगमनाथ' या नांवावरून उघड होतें. हा संगमेश्वर म्हणजे श्री बसवेश्वरांचा 'कूडलसंगम' होय. आपल्या कवीनें म्हटल्याप्रमाणें हें 'स्थान पवित्र उत्तमोत्तम' असून बागलकोटपासून सुमारें पन्नास मैल दूर आहे. कवीविषयीं तेथें कांहीं माहिती मिळेल म्हणून तेथें जाऊन आलों. पण त्याबाबत निराशाच पदरीं आली.

चंद्रात्मज हा दुसऱ्या शिवबोधांचा चुलत बंधू होता हें मान्य व्हावयास हरकत नाहीं. 'देशिक चरित्रां'त सांगितल्याप्रमाणें होसुरास (मल्लिकार्जुन) कुलकर्ण्यांकडे 'भीमातीराहुनी' कोणी आप्त आले होते. संगमनाथ (म्हणजेच दुसरे रंगबोध) हा त्यांचा मुलगा. पहिल्या शिवबोधांनीं त्याला त्याच्या आईवडिलांकडून मागून घेतलें. आणि पुढें त्याला आपली मुलगी दिली.

मुडलगीच्या सध्यांच्या स्वामींकडून अशी कथा ऐकावयास मिळाली कीं, संगमनाथास मागून घेतांनां त्याच्या आईस स्वामींनीं 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद दिला आणि तो अक्षरशः खरा झाला. या अष्टपुत्रांपैकींच 'चंद्र' एक होय. या घराण्याचा वंशवृक्ष असा देतां येईल. *

आज याहून अधिक माहिती उपलब्ध झालेली नाहीं. त्यामुळें चंद्रात्मज रुद्राच्या 'अगाध लीलां' संबंधींहि कांहीं सांगतां येत नाहीं. त्याचें 'विवेक सिंधू'चें श्रवण मुडलगीच्या स्वामींशीं निकटचा संबंध दाखविणारेंच आहे. कारण स्वामींची परंपरा ही मुकुंदराजांची परंपरा आहे.[२९] आपल्या कवीच्या निश्चित स्थळाचा बोध झाला नाहीं तरी त्याचा शोध 'भीमातीरावर' आज ना उद्यां लागूं शकेल. म्हणूनच गोदातीरावरील [३०] चंद्रभटाशीं 'एकनाथ भागवतपरायण' या उक्तीमुळें कवीचा संबंध जोडावासा वाटला तर तो 'बादरायण संबंध' ठरेल. 'देशिकचरित्रा'च्या मंगलाचरणांत चंद्रात्मजा जवळच 'आत्मास्वामी, रंगनाथ' आल्यानें चंद्राजीपंताशीं त्याचा संबंध आहे कीं काय असें वाटलें तरी त्यांत फारसा अर्थ नाहीं.

२६. स्वामींचें भारद्वाज गोत्र ...... ॥ देशिकचरित्र, ५-२९

२७. वर्णामाजी अग्रवर्ण । ऋग्वेदशाखा अश्वलायन ।
बसीष्ठ कौंडिन्य मैत्रावरुण । त्रिप्रवर गोत्र वसिष्ठ ॥ —उद्योगपर्व, १२-१७७.

२८. तो कुलदेव संगमेश्वर । आदिगुरु परात्पर ।
कपिला संगमीं निरंतर । वास अनादि ज्यासीं ॥
प्रत्यक्ष भासे कैलास परम । कृष्णामलापहारीचा संगम ।
स्थान पवित्र उत्तमोत्तम । शिव सार्वभाम जें स्थळीं ॥

२९. महाराष्ट्रसाहित्य पत्रिका, आक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९५८.

३०. गोदावरी उत्तर तीरीं । चौयोजनीं चंद्रगिरी ।
श्री जनार्दन तेथवरी । दैवयोगें फेरी स्वभावें गेलों ॥
तो अतिदीर्घ चंद्रगिरी । तळीं चंद्रावती नगरी ।
स्वयें चंद्रनाम द्विजवरीं । वस्ती त्याचे घरीं सहज घडली ॥ — (चतुःश्लोकीं भागवत).

* पहाः —



## कवीचीं गुरुपरंपरा

देव[३१] आणि चांदोरकर[३२] यांनीं थोड्याफार फरकानें चंद्रात्मज रुद्राची पुढीलप्रमाणें गुरुपरंपरा दिली आहे- दत्तात्रय-अद्वैतानंद-परमात्मानंद-योगेश्वरानंद - हंसानंद-अमृतानंद-ब्रह्मानंद-विमळानंद-चिदानंद-प्रसन्नानंद-रामानंद-व्यंकटेश-चंद्रात्मज.

चांदोरकर कवीच्या गुरूचें नांव 'व्यंकटनाथ' असें देतात. हे 'व्यंकटेश' किंवा 'व्यंकटनाथ' कोण व कोठले याचा कांहींच उलगडा होत नाहीं. तंजावर येथील सरस्वती महालाच्या वर्णनात्मक ग्रंथसूचींत[३३] वेंकटेश पति, व्यंकटगिरि प्रभु, वेंकटेशगिरि आणि वेंकटेश यांच्या कृतींचे उल्लेख आढळतात. यांपैकीं कोणी कवीचा गुरु असण्याचा संभव आहे.

## कवीचा काळ

चंद्रात्मज रुद्राचा काळ स्थूलमानानेंच ठरवितां येणें शक्य आहे. तो मुक्तेश्वराला वंदन करतो[३४] परंतु नंतरच्या कवीचा उल्लेख करीत नाहीं. "यावरूनप्रस्तुत कवि मुक्तेश्वरानंतर थोड्याच वर्षांनीं होऊन गेला असावा, असें वाटतें" हा आजगांवकरांचा अभिप्राय[३५] सर्वमान्य होण्यासारखा आहे. प्रा. दे. सी. पंगूनीं मुक्तेश्वराचा काल श. १४९५-९६ तें श. १५६७-६८ असा दिला आहे.[३६] म्हणजे या कालामागें चंद्रात्मज रुद्रास नेतां येणार नाहीं. त्याचा उल्लेख करणारें 'देशिकचरित्र' श. १७०७ मधील असल्यामुळें या शकाच्या अलीकडे त्याला ओढता येणार नाहीं.

यांहून कालानिर्णयाचें एक साधन म्हणजे चंद्रात्मज रुद्राच्या चुलत्याचा- दुसऱ्या रंगबोधाचा- माहीत असलेला काळ. पहिले शिवबोध श. १६२८ मध्यें समाधिस्थ झाले. त्यापूर्वी संगमनाथाची भेट झाली. तेव्हां या मुलाचें वय साधारणपणें आठ वर्षांचें मानलें तर संगमनाथ ऊर्फ दुसरे रंगबोध यांचा जन्म श. १६२० च्या सुमारास झाला असें म्हणतां येईल. यानंतर आपल्या कवीच्या वडिलांचा- चंद्र यांचा- जन्म. यावरून चंद्रात्मज रुद्राचा जन्म श. १६४० च्या आसपास केव्हांतरी झाला असावा असें मानण्यांत अडचण नाहीं.

(दुसऱ्या) शिवबोधांहून तो वयानें थोडासा लहान असावा. हे शिवबोध श. १७०१ मध्यें स्वर्गवासी झाले असें त्यांचा भाचा धुंडिराज म्हणतो.[३] याच शकाच्या आगेमागे चंद्रात्मज रुद्राचा अंत झाला असावा. 'देशिकचरित्रा'च्या लेखनकाळीं आपला कवि हयात नसावा या तर्कास आज तरी बाधक आधार नाहीं. चंद्रात्मजरुद्र हा त्याच्याकाळीं 'मुनि' म्हणून प्रसिद्ध होता; कवि म्हणून माहीत नव्हता हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे. तेव्हां श. १६४० ते श. १७०० हा चंद्रात्मज रुद्राचा काळ ठरवावासा वाटतो.

चांदोरकरांनी श. १६७०-१६५० च्या सुमारास हा कवि झाल्याचें म्हटलें आहे. म्हणजे ज्या शतकाच्या प्रथमार्धांत हा कवि होऊन गेला असें त्यांना वाटतें, त्या शतकाच्या उत्तरार्धांत या कवीस मी नेऊन ठेवतों. त्यांनींच या कवीच्या 'गोकर्णमाहात्म्या'चा लेखन शक १६८७ दिला आहे व हाच शक श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरांतील 'उद्योगपर्वा'च्या प्रतीचा असल्याचें देव लिहितात. या प्रती कवीच्या हातच्या - किमान त्याच्या काळच्या- असाव्यात असें मला वाटतें.[३८]

३१. श्रीरामदासी संशोधन, खं. २, पृ. २६९-७०.
३२. संतकविकाव्यसूची, पृ. ३५.
३३. Vol. III, pages, 23, 105, 135, 51; 176.
३४. मुक्तीचा ईश्वर मुक्तेश्वर। साहित्यरत्नांचें भांडारागार ॥......
३५. महाराष्ट्र कविचरित्र, भाग २ रा, पृ. ३७.
३६. प्राचीन मराठी कविपंचक, पृ. २३. मला हा कालनिर्णय मान्य नाहीं. कारण मुक्तेश्वरांचा जन्म श. १५३१ मध्यें झाला असें माझेंहि मत आहे. परंतु येथें या वादास जागा राहूं नये म्हणून कै. पंगूंच्या मताप्रमाणें काल दिला आहे.
३७. विकारी नाम संवत्सरीं। चैत्र वद्य सप्तमी सौम्यवारीं।
आली असतां कन्यागती। कृष्णा वेणीसीं भागीरथी ॥
३८. श. १६८७ हा या ग्रंथांच्या रचनेचाच काळ असला पाहिजे; प्रत्यक्ष ग्रंथ पाहिल्याखेरीज निश्चित मत देणें कठीण आहे.












**कवीच्या काव्यकृति**

महाभारत लिहिणारा कवि म्हणूनच चंद्रात्मज रुद्र अनेकांना माहीत आहे. चांदोरकर 'गोकर्णमाहात्म्य' व 'महाभारत' हे ग्रंथ त्याच्या नांवापुढें देतात. 'महाभारत' म्हणजे संपूर्ण कीं कांहीं पर्वें याचा खुलासा ते करीत नाहींत. "यांनीं आपल्या उद्योगपर्वांत मुक्तेश्वरास नमन केलें आहे", ही त्यांची माहिति या 'महाभारतां'त 'उद्योगपर्व' तरी असल्याची खात्री पटविणारी आहे.

या कवीनें 'उद्योगपर्व' तेवढें लिहिलें असा कित्येक विद्वानांचा समज आहे. "कानडी ग्रंथावरून मराठींत उद्योगपर्व रचणारा चंद्रात्मज रुद्र (१६०४)" असें भावे लिहितात.[३९] "चंद्रात्मज रुद्र यानें उद्योगपर्व रचिलें आहे," असें डॉ. नांदापूरकर म्हणतात.[४०] वा. दा. ओकांनाहि चंद्रात्मजाचें १७ अध्याय व १७५० ग्रंथसंख्या असलेले 'उद्योगपर्व'च माहीत होतें.[४१] काळ्यांनीं पाठवून दिल्यामुळें आजगांवकरांना या कवीचें 'भीष्मपर्व' पाहतां आलें. "यावरून कवीनें सबंध महाभारतावर मराठी कविता केली आहे कीं, एकदोन पर्वेंच उतरलीं आहेत, याचाहि निर्णय करितां येणें शक्य नाहीं," या आजगांवकरांच्या मताशीं[४२] मी सहमत आहे.

"मुक्तेश्वरी भारत पूर्ण करण्याची खटपट" करणाऱ्या कवींत डॉ. तुळपुळे[४३] चंद्रात्मज रुद्राचा समावेश करतात. तर 'मुक्तेश्वरी कवितेसारखी कविता करण्याचें ध्येय' चंद्रात्मज रुद्रानेंहि डोळ्यापुढें ठेवल्याचा समज आजगांवकरांनीं करून घेतला आहे. "चंद्रात्मज कवीच्या कवितेचा थाट मुक्तेश्वरी झोंकाचा दिसतो"; हें या समजाच्या मुळाशीं कारण आहे. पण हा समज बरोबर नाहीं.

मुक्तेश्वरास 'साहित्यरत्नांचें भांडारागार' असें आपला कवि म्हणतो. त्या अर्थी मुक्तेश्वराबद्दल त्याच्या मनांत आदरभाव वसत होता हें कबूल केलें पाहिजे. पण त्याचें स्फूर्तिस्थान वेगळें होतें. मुक्तेश्वर किंवा कोणताहि संस्कृत कवि त्यांच्या डोळ्यांपुढें आदर्श म्हणून नव्हता. "आपणांस संस्कृतचा अभ्यास नाहीं, कर्नाटक कवि कुमारव्यासांच्या आधारें आपण ग्रंथ लिहीत आहों," असें चंद्रात्मजानें प्रारंभीच सांगितलें आहे.[४४] या निवेदनाची दखल घेतली असेल तर ती भाव्यांनीं. आजगांवकरांनीं ही ओवी उद्धृत करूनहि या कवीचें वेगळेंपण मान्य केलें नाहीं.

चंद्रात्मज रुद्रानें मुक्तेश्वरांचें अनुकरण केलें असें म्हणण्यापूर्वीं मुक्तेश्वरांच्यावर कोणाचा परिणाम झाला असावा याचा विचार केला पाहिजे. मुक्तेश्वरांच्या 'सभापर्वा'तील कांहीं ओव्यांचें कुमार व्यासांच्या 'उद्योगपर्वा'तील एका उताऱ्याशीं शं. बा. जोशी[४५] यांनीं दाखविलेलें साम्य चिंतनीय आहे. कुमार व्यास आणि मुक्तेश्वर यांचा तुलनात्मक अभ्यास झाल्याखेरीज एखादा निष्कर्ष काढणें घाईचें ठरेल. मुक्तेश्वरास कन्नड चांगलें येत असावें अशी माझी समजूत आहे. एकनाथांना तरी येत होतें असें मानावयास त्यांच्या नांवावर असलेल्या कांहीं कन्नड कृतींचा आधार आहे.[४६] चंद्रात्मज रुद्र व मुक्तेश्वर यांच्यांतील

---

३९. महाराष्ट्रसारस्वत, पृ. ५०४ भावे श. १६०४ हा काळ कोणत्या आधारावर देतात हें स्पष्ट होत नाहीं. अर्थात् हा काळ मला मान्य नाहीं.

४०. मराठी महाभारताचें स्वातंत्र्य, पृ. २

४१. मोरोपंतकृत महाभारत, उद्योगपर्व, पृ. ३३३.

४२. महाराष्ट्र कवि चरित्र, भाग २ रा, पृ. ३६.

४३. महाराष्ट्र सारस्वत, पुरवणी, पृ. १०४३ (येथें 'चंद्रात्मज, रुद्र,' या कवीच्या नांवांत स्वल्पविरामानें अनर्थकारक कामगिरी केली आहे!)

४४. मज संस्कृति नाहीं अभ्यास। कर्नाटक कवि कुमार व्यास।
त्याचेनि आधारें ग्रंथविलास। प्रारंभिला हा हेतु॥

४५. मऱ्हाटी संस्कृति। कांहीं समस्या, पृ. १०४.

४६. या विषयासंबंधीं मी स्वतंत्र विवेचन करीत आहे.



अनुक्रमणिका






साम्याचें हें एक संभाव्य कारण नजेरआड करून चालणार नाहीं.

कवीचें 'उद्योगपर्व' धुळयाच्या श्री समर्थ वाग्देवता मंदिरांत आहे.[४७] 'भीष्मपर्व' आजगांवकरांच्या संग्रहीं असावें असें वाटतें. चौकशी करूनहि निश्चित कांहीं कळलें नाहीं. धुळयाच्या संग्रहांतच 'चंद्रावळी' नांवाचें त्याचें १०३ श्लोकांचें प्रकरण आहे.[४८] चांदोरकरांनीं ' गोकर्णमाहात्म्य ' नांवाचा ग्रंथ चंद्रात्मजाच्या नांवावर दिल्याचा उल्लेख वर आलाच आहे. 'महाराष्ट्र-सारस्वता'च्या सूचींत ' चंद्रात्मजकृत श्रीखंड्याचें चरित्र ' असें नांव दिलें गेलें आहे.[४९] परंतु भाव मात्र लिहितात, ' श्रीखंड्यांचें चरित्र ' वगैरे आख्यानें गाणारा प्रभुनंदन ( १६३३ ) '...हा 'मुद्राराक्षसा'चा प्रताप असणेंहि शक्य आहे !

चंद्रात्मजरुद्राचीं कांहीं पदेंहि मला मुडलगी येथें उपलब्ध झालीं असून वानगीदाखल त्यांतील दोन देतों. विषय तात्विक असला तरी शैली पाहाण्यासारखी आहे.

### पद १

आहे आहे आहे सर्वाभुती पाहे स्वात्मरूप सखया
त्याहुनि जाण दुज नसे त्रीजगी हेचि वोप सखया ॥
ब्रह्म क्षेत्रि वैस्य शुद्रादी करूनि नाना याती सखया
सान थोर बहुरंग जोती मोती तोय स्वांती सखया
संतु पटी घटी मृतीका हाटक बहुधाकृती सखया
यापरिस्थावर जंगम सचिदानंदमूर्ती सखया ॥ १ ॥
ना कळे जरी ऐस तुज गुरुवरा शरण जाई सखया
उंच निच शेवा न म्हणतां सदभावे फार काही सखया
करूनि लीनपण श्रीदेशिक कृपा लाहि सखया
सांप्रदायक्रम बोधसुधारस आमर होयी सखया ॥२॥
सहजीं सहाजि मग ब्रह्म सदोदीत तुचि होसी सखया
विश्वाकार मीची प्रती ती तुजलागी होय ऐशि सखया
बुद्बुद फेन तरंग सकळ येक अंबुरासि सखया
चंद्रसुत म्हणे सद्गुरु व्यंकटधिशेवेसि सखया ॥ ३ ॥

### पद २

भवांबुधितारक गुरुवर हो । भासत दुस्तर हो ॥ध्रु॥
ममता व ( तिं ) मोहजल (जे)। खोल भयंकर हो ॥१॥
मीपण लाटा कामादिक जे । जांचिती जळचर हो ॥२॥
चंद्रात्मज प्रभू व्यंकटराजे । पार करि पर हो ॥३॥

याखेरीज त्याच्या 'दत्ताष्टका'चे शेवटचे तीन श्लोक मला मिळाले आहेत. वरील दोन पदांत त्यानें स्वतःचा उल्लेख 'चंद्रसुत' व चंद्रात्मज प्रभू' असा केला आहे तर ' दत्ताष्टकांत ' तो स्वतःचें नांव ' चंद्रात्मजु ' असें देतो.[५१]

चंद्रात्मजरुद्रानें मराठीप्रमाणें कन्नडमध्येंहि रचना केली आहे, ही गोष्ट सांगण्यासारखी आहे. मराठी व कन्नड या दोन्हीभाषांत सारख्याच प्रभुत्वानें काव्यलेखन करणारे कवि थोडे नाहींत. आपला कवि त्यांचा अग्रणी शोभावा इतक्या योग्यतेचा आहे.

मला त्याचीं दोनच त्रुटित ( कन्नड ) प्रकरणें मिळालीं. प्रकरणांचीं कांहीं पानें मिळालीं असें म्हणणें अधिक बरोबर दिसेल. दोन्हीहि संस्कृत कृतींवरील टीका आहेत. एक ' मनीषा पंचका'वरील. ही टीका म्हणजे ६ श्लोकांचें प्रकरण दिसतें. त्याच्या शेवटच्या ओवी[५२] तेवढ्या मिळाल्या.

दुसरी टीका ' महिम्नस्तोत्रा'वरली आहे. प्रारंभीः– " श्रीगणेशाय नमः श्री शारदा गुरू प्रसंनानंदवरदो भव ॥ महिम्न सटीक । लेखन प्रारंभ ॥ भामिनी-षट्पदी छंद ॥ " असा गद्य मजकूर आहे. नंतर कवि

---

४७. बाडांक ११७८.
४८. बाडांक १२०१.
४९. महाराष्ट्रसारस्वत, पुरवणीसह, पृ. १०९६.
५०. उपर्युक्त, पृ. ५०४
५१ ... तद्रुपगुरु व्यंकटेश चरणांभोजी मीलिंदाकृति ।
झुंकारि ईति अष्टभाव सरिसी चंद्रात्मजु सांप्रती ॥
५२ (प) दरज चंद्रनंदन गोपितार्थव प्रगटिसिद कन्नडदि विनयदली ॥ ६ ॥ इति श्री मनिषापंचक-सहटिका संपूर्ण श्री गुरुनाथार्पणमस्तु ॥











गणपति, शारदा, गुरु, संगमेश्वर व सज्जन यांना नमन करून टीकेस सुरुवात करतो.[५३]

टीकेच्या शेवटीं, गूढ असलेल्या या स्तोत्राचा अर्थ आपण यथामति स्पष्ट करीत असल्याचें सांगून तो गुरूच्या व आपल्या नांवाचा उल्लेख करतो.[५४] मुडलगी मठांतच मला 'उद्बोधप्राज्ञ' नांवाचा भामिनीषट्पदी छंदांतील कन्नड ग्रंथ मिळाला. ग्रंथाचा विषय वेदांत आहे. त्यांत कवीचें नांव कोठेंच आढळत नसलें तरी चंद्रात्मज रुद्राचें कन्नडवरील प्रभुत्व, वेदांताविषयीं लिहिण्याचा अधिकार आणि भामिनीषट्पदीवरील प्रीति पाहतां हा ग्रंथहि त्याचाच ठरण्याचा संभव आहे. मला उपलब्ध झालेली ही सर्व कन्नड रचना देवनागरी लिपींत आहे; हेंहि सांगण्यासारखें आहे.

चंद्रात्मज रुद्राच्या समग्र काव्याचें[५५] संकलन व संपादन करून तें प्रकाशांत आणतांना त्याच्या काव्याचा सांगोपांग अभ्यास मांडतां येईल. तोंपर्यंत आधींच मर्यादा घालून घेतल्याप्रमाणें त्याच्या चरित्रासंबंधीं व कृतीसंबंधीं नवीन कांहीं सांगण्याकडेच लक्ष दिलें आहे.

---

५३ वंदनेय माडुवेनु गणपगे । छंद दिंदलि शारदंबिगे ।
कुंदनोडदे ( ...१... ) नंदगुरुपदके । इंदुधर शिवसंगमेश्वर ।
निंदसले दयपडदु ऐक्यद मंदिरद लेप्पवरु सज्जनरिगे नमिसुवेनु ॥ १ ॥

५४. गूढविदु अर्थदि यथामति । गूडिदलि कन्नडिसि स्तोत्रव ।
रूढिसिदे भामिनिय गतियलि षट्पदंगळनु ॥
रूढियोळ्गुरू व्यंकटेशनु । गाड चंद्रात्मजन हृदयदि ।
मूडिनुडिसिदनेंदु बिन्नविसिदनु विनयदली ॥ ३९ ॥

५५. समग्र काव्य मिळविणें जवळजवळ अशक्यच आहे. उदाहरणार्थ, चद्रात्मज रुद्राचीं कांहीं प्रकरणें कोंकणांत एका गृहस्थास मिळालीं असल्याचा उल्लेख आजगांवकरांनीं केला आहे. हा उल्लेख १९१२ मधील. कोंकणांतील त्या गृहस्थास कोठें शोधावें बरें !

---

श्री. ना. ब. जोशी

# माधवस्वामी–काल व नाथ संबंध विचार

" एकनाथ महाराज व तिरुवेळंदूरचे माधवस्वामी " या विषयावर भा. इ. सं. मंडळाच्या संमेलनांत माझा एक निबंध वाचला गेला. तोच पुढें नवभारताच्या जानेवारी १९६०च्या अंकांत छापला. त्यानंतर श्री. वं. वि. पारखे यानीं नवभारताच्याच एप्रिल १९६० च्या अंकांत " माधवस्वामी: कालनिर्णय व एकनाथ संबंध " हा लेख लिहून माझ्या कांहीं मतांबद्दल भेद दर्शवून आपली त्या संबंधींची कल्पना मांडिली. त्यामध्यें मुख्यतः दोन गोष्टींचा विचार आहे. माझे मतें माधवस्वामींचा जन्म शके १५६९–७० मधील असावा तर श्री. पारखेंचे मतें तो १५९० मधील असावा व माझे मतें एकनाथ महाराजांच्या दुसऱ्या मुलीच्या नाथांच्या निर्याणानंतर झालेल्या, मुलाचें नांव एकनाथ असावें व त्याची मुलगी उमा ही माधवस्वामीची आई असावी तर श्री. पारखेंचे मतें स्मृतिकौस्तुभकर्त्या अनंतदेवाचा पूर्वज एकनाथाची मुलगी उमा ही माधवस्वामीची आई असावी. माधवस्वामींचा नातु वासुदेव आपल्या ग्रंथांत एकनाथ महाराजांशीं रक्तसंबंध दाखवितो तो श्री. पारखेनां मान्य नाहीं व असा रक्तसंबंध मानण्यांत माझी चूक झाली आहे, नसत्या कांहीं विचारांचा माझ्या मनावर पगडा बसल्यानें मी या विचारास प्रवृत्त झालों असें त्याचें म्हणणें आहे. मात्र माझा एक महत्त्वाचा निर्णय कीं नाथमहाराजांची मुलगी माधवस्वामीची आई नव्हे हा त्यानां पूर्णपणें मान्य आहे.

## माधवस्वामींचा जन्मकाल

श्री. पारखेंच्या मतभेदापैकीं प्रथम माधवस्वामींच्या जन्मकालाविषयीं विचार करून नंतर त्यानीं सुचविलेल्या एकनाथाविषयीं विचार करणें सोईचें होईल म्हणून तोच क्रम अवलंबिला आहे.

श्री. पारखे माधवस्वामींचा जन्म शके १५९० सुमाराचा असावा असें ठरवितानां श्री समर्थांच्या शके १६०० च्या तंजावरच्या भेटीचा उल्लेख करतात व त्याच वेळीं समर्थानीं राघवस्वामींना कोनूरास मठ स्थापून तेथील महंत नेमलें व रामदासस्वामींच्या शिस्तीप्रमाणें राघवस्वामींचे शिष्य माधवस्वामी त्या वेळीं ( शके १६०० मध्यें ) फारतर १०–१५ वर्षांचे असावे म्हणून माधव स्वामींचा जन्म श. १५९० च्या सुमाराचा असावा. त्यांचा दुसरा मुद्दा असा कीं माधवस्वामीनीं शके १६१५ मध्यें जें एकोणीसहजार ओंव्यांचें रामायण रचिलें ती त्यांची पहिली कृति असावी व त्या वेळीं त्यांचें वय २०-२५ वर्षांचे दरम्यान असावें.

श्री. पारखे यानीं शके १६०० च्या तंजावरच्या भेटीचे वेळीं कोनूरचा मठ स्थापून रामदास स्वामीनीं राघवस्वामीनां तेथें ठेविलें असें लिहितानां त्यास कांहींहि आधार दिला नाहीं. उलट महाराष्ट्र सारस्वत पान ९९३ वर असें स्पष्ट म्हटलें आहे कीं समर्थानीं शके १५७७ च्या भेटींतच कोनूरास मठ स्थापून त्यावर राघवस्वामींची योजना केली. यावेळीं राघवस्वामींचें वय २५ ते ३० असणें अस्वाभाविक नाहीं. शके १५६९–७० मध्यें माधवस्वामींचा जन्म धरला तर शके १५८०-८५ च्या दरम्यान ते १०-१५ वर्षांचे ठरतात व कदाचित् त्या सुमारास ते राघवस्वामींचे शिष्य झाले असावें व श्री. पारखेंची कल्पना कीं रामदासस्वामींचा लहान मुलानांच उपदेश द्यावयाचा दंडकच होता त्या त्यांच्या कल्पनेशींहि सुसंगतपणें










हा काल बसतो. याप्रमाणें त्यांचें एक प्रमाण त्यांच्या विरुद्धच जातें.

**ओवीरामायण–**

आतां त्यांचें म्हणणें कीं माधवस्वामींचें शके १६१५ मध्यें लिहिलेलें ओंवी रामायण ही माधवस्वामींची पहिली कृति असावी व त्यावेळीं त्यांचें वय २०–२५ चे दरम्यान असावें. तो ग्रंथ १९ हजार ओंव्यांचा असून एवढा मोठा ग्रंथ प्रथम कृति असण्याचा संभव नाहीं. नाथ महाराजांचा चतुःश्लोकी भागवत अथवा मुक्तेश्वराचें रामायण वयाच्या २०–२२ दरम्यान लिहिलेले ग्रंथ होत पण ते ओंवीरामायणाच्या एक दशांशापेक्षांहि लहान आहेत. या वयांत व विशेषतः एवढी मोठी ओंवीसंख्या असलेली पहिली कृति आढळत नाहीं. ज्ञानेश्वर महाराज हे सर्व दृष्टीनें अपवाद आहेत तरी पण त्यांची ज्ञानेश्वरी नऊ हजार ओंव्यांचीच आहे. श्री. पारखे आपल्या म्हणण्यास आधार देत नाहींत. चार दोन तरी अशीं उदाहरणें त्यानीं दाखवावयास पाहिजे होतीं. माझ्या तरी माहितींत असें उदाहरण नाहीं. पुढें शके १६१८ मध्यें त्यानीं योगवासिष्ठावर लेखन केलें पण विषय, मांडणी व भाषा पहातां ते त्यावेळीं प्रौढच असले पाहिजेत. या सर्व दृष्टीनें पहातां माधवस्वामी ओंवी रामायण लेखनाचे वेळीं प्रौढच असले पाहिजेत. याचा अर्थ ते चाळीसच्या पुढें असले पाहिजेत.

माधवस्वामीनीं शके १६२९ सर्वजित संवत्सरांत बहुतेक करून श्री गणेशपुराण लिहावयास घेतलें असावें व शके १६३५ मध्यें विजय संवत्सरीं पूर्ण केलें. " सकलजये साधारण " या शब्दांवरून ( पहा : T. M. S. Catalogue Page 182 ) सर्वजित् संवत्सरांत साधारणतः लिहिण्यास सुरवात केल्याचें सूचित केलें आहे असें वाटतें. तें कांहीं असो, शके १६३५ विजय संवत्सरांत गणेशपुराण लिहून पूर्ण झालें व त्यानंतर मात्र एकहि ग्रंथ माधवस्वामीनीं लिहिल्याचें आढळत नाहीं. राम पंडित अथवा वासुदेव यापैकीं कोणीहि तसें म्हणत नाहीं. सध्या तंजावर संग्रहांत असलेल्या ग्रंथांचेपेक्षां जास्तीचें नांव कोणी देत नाहीं. यावरून माधवस्वामी एक तर वृद्ध झाल्यानें लिहूं शकत नव्हते अथवा श. १६३५ नंतर लवकरच ते निवर्तले असावेत. जर श्री. पारखेंच्या मताप्रमाणे शके १५९० चा त्यांचा जन्म असता तर ते शके १६३५ मध्यें फक्त पंचेचाळीस वर्षांचेच असते व त्यानींच स्वतः हरिवंश व भागवत दशमस्कंध लिहिला असता. असो.

वर दिलेल्या कारणाखेरीज आणखी एक गोष्ट विचारांत घेणे अवश्य आहे. तंजावरचे राजे एकोजी यांचे नंतर शके १६०४ मध्यें त्यांचे चिरंजीव शहाजी राजे गादीवर आले. ते शके १६३३ मध्यें परमपदास पावले. त्यांचा जन्म शके १५९३ मधला. ( पहा, तंजावर येथील शिलालेख पान ४६ ). ज्या अर्थी या शहाजी राजांचे माधवस्वामी हे गुरू होते त्या अर्थी, सर्वसाधारण व्यवहाराप्रमाणे, ते शहाजी राजांच्या पेक्षां १५–२० वर्षांनीं तरी मोठे असले पाहिजेत. जवळ जवळ समवयस्कास सहसा कोणी गुरू करीत नाहीं. या दृष्टीनें पाहतांहि माधवस्वामी १५६९–७० च्या सुमारास जन्मले असले पाहिजेत यास दुजोरा मिळतो. राजाचें लक्ष्य वेधण्यास कांहीं काल जावा लागतोच शिवाय माधवस्वामी तंजावरापासून दूर होते हेंहि लक्षांत घेणे योग्य ठरेल. शहाजीराजे शके १६३३ मध्यें वारल्यानंतर लवकरच दोन तीन वर्षांनीं त्यांचे गुरु माधवस्वामी गेले असावेत व ही घटना थेट रामदासस्वामी शिवाजीमहाराजांचे नंतर लवकरच गेले याशीं विलक्षण साम्य दर्शविणारी आहे. असें घडलें नसेल असें तरी कसें म्हणावें ? मात्र हा सर्व मजेदार तर्क आहे हेंहि तितकेंच खरें. संशोधनांत असे






गमतीचे प्रसंग कित्येक वेळां येतात त्याचा हा एक नमुना आहे. असो.

## माधवस्वामींची आयुर्मर्यादा

श्री. पारखे यानीं आपल्या लेखांत माधवस्वामींची आयुर्मर्यादा ठरविण्याचा प्रयत्न केला आहे त्याचा थोडा विचार करून नंतर त्यांच्या एकनाथाकडे वळूं.

श्री. पारखेंच्या मतें माधवस्वामी शके १६७० मध्यें हयात असावेत, व त्यावेळीं त्याचें वय ८० वर्षांचें असावें हेंहि ओघानेच आलें. ते त्यास "पुढेही ताताज्ञेने, स्वप्नांत ईश्वराज्ञेनें, हरिवंशावर टीका केली" हा आधार देतात. पण ती तातांची आज्ञा स्वप्नांतील आहे प्रत्यक्ष नव्हे या गोष्टीकडे त्यांचें लक्ष्य गेलें नाहींसें दिसतें. व याप्रमाणें पहातां शके १६७० मध्यें माधवस्वामी हयात नव्हते हें स्पष्ट होईल. आतां त्यांचा शके १६५८ चा विचार. "परंतु ताताचे आज्ञोत्तर" हे दशमस्कंधांतील राम पंडिताचे शब्द आधार म्हणून त्यानीं दिले आहेत. यांचा अर्थ तातांचे शेवटच्या इच्छेप्रमाणे व म्हणून आज्ञेप्रमाणें असाहि करतां येण्याजोगा आहे. पण हा जरा दूरान्वयी अर्थ सोडला व त्यावेळीं ते हयात होते असा जरी तर्क केला तरी ते त्यावेळीं माझ्या जन्मशकाप्रमाणें ८८ वर्षांच्या आसपासचे ठरतात. म्हणजे शके १५६९–७० च्या सुमाराचा माधवस्वामींचा जन्म असावा अशा माझ्या कल्पनेस मुरड घालण्याची कांहींहि आवश्यकता नाहीं. माधवस्वामींचें आयुर्मान जास्तीत जास्त शके १५७० ते १६५८ ठरूं शकेल. मात्र शके १६३५ नंतर त्यांची कांहींहि ग्रंथरचना उपलब्ध नसल्यानें ते शके १६३५ नंतर लवकरच गेले असावेत असेंच मला वाटतें. म्हणजे ते वयाच्या सत्तरीच्या आंतच परमपद पावले असावेत हेंच जास्त शक्य.

## श्री. पारखेंनीं सुचविलेला एकनाथ

आतां आपण श्री. पारखेनीं जो एकनाथ सुचविला आहे त्या एकनाथाकडे वळूं. त्यांचे मतें "स्मृतिकौस्तुभ" कर्ता जो अनंतदेव त्याचा पूर्वज एकनाथच माधवस्वामींचे आजोबा. हें मत मांडतांना त्यानीं तो कृष्णभक्त होता हा आधार घेतला आहे. त्यांचें म्हणणें कीं नाथमहाराज विठ्ठल भक्त होते. विठ्ठलाचाच त्यांना साक्षात्कार होता. कृष्णभक्त विशेषत्वानें तरी नव्हते. यांच्या या विधानांचा विचार करूं. प्रथमतः हें स्पष्ट केलें पाहिजे कीं नाथांना श्री दत्तात्रयाचेंच दर्शन झालें होतें. त्यांचे गुरूहि दत्तभक्त व त्यांचा उपदेश अगर मंत्रहि दत्ताचाच. पण एकनाथ महाराज पूर्ण अद्वैती असल्यानें ते विठ्ठल, कृष्ण वगैरे भेदानां महत्त्व देत नव्हते. शिवाय त्यांनींच आपल्या रुक्मिणी स्वयंवराच्या अगदीं पहिल्या ओंवीत म्हटलें आहे "ॐ नमोजी कृष्णनाथा। गणेश सरस्वतीनामें धरितां। तूंचि तूं कुळदेवता। कवणा आतां मी प्रार्थू॥ १॥" यावरून कृष्ण हें त्यांचें कुलदैवत होतें. यावरून वासुदेवानें आपले ग्रंथांत एकनाथांना कृष्णभक्त म्हटलें यांत गैर कांहींच नाहीं. शिवाय या एकनाथानीं भागवत एकादश स्कंधावर टीका लिहिली हें जगप्रसिद्ध आहे. श्री. पारखेंच्या एकनाथानें भागवत टीका लिहिली असावी कीं काय याचें संशोधनच करावयास हवें कारण तसा अजून तरी उल्लेख दिसला नाहीं. यानंतर श्री. पारखेनीं सुचविलेला एकनाथ कालदृष्ट्या माधवस्वामीचे मातामह ठरतील काय हेंहि तपासून पहाणें जरूर आहे. श्री. पारखे आपल्या कृष्णभक्त एकनाथाचा काल शके १५२६ चा ठरवितात. मात्र हा शक त्याच्या जन्माचा कीं मृत्यूचा याचा खुलासा ते करीत नाहींत. आपण थोडे खोलांत जाऊनच विचार करूं व काय दिसतें तें पाहूं. अनंतदेवाची कृति स्मृतिकौस्तुभ त्याचे प्रौढपणीचीच असल्याचें डॉ. काणे आपल्या हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासाच्या पान ४५३ वर सांगतात. इ. स. १६७३ मध्यें अनंतदेव जर प्रौढ होता म्हणजे चाळीस वर्षाचे पुढें होता तर त्याचा जन्म इ. स.








१६३० चा मानणे सत्यास फारसें सोडून होणार नाहीं कारण सर्व अंदाजानेच घ्यावयाचें आहे. डॉ. कार्णेच्या प्रमाणेच पंचवीस वर्षांची पिढी धरल्यास खालीलप्रमाणे जन्माचे इ. स. येतात.

| | | |
|---|---|---|
| अनंतदेव | इ. स. | १६३० |
| आपदेव दुसरा | ,, | १६०५ |
| अनंत | ,, | १५८० |
| आपदेव पहिला | ,, | १५५५ |
| एकनाथ | ,, | १५३० |

इ. स. १५३० – ७८ = १४५२ शक वर्ष. एकनाथाचा जन्म शके १४५२ चा येतो १५२६ चा नाहीं. श्री. पारखे इ. सनाचें शकांत रूपांतर करण्यास विसरले व तोच शक मानून विचारास लागले त्यामुळें सर्वच गोंधळ झालेला दिसतो. आतां या शके १४५२ मध्यें जन्मलेल्या एकनाथास त्याच्या वयाच्या पन्नासाव्या वर्षी उमा झाली असें धरलें तरी म्हणजे तिचा १५०२ शकेचा जन्म धरला तरी किती पंचाईत होते पहा. श्री. पारखेंच्या शके १५९० मध्यें जन्मलेल्या माधवस्वामीस उमेनें आपल्या वयाच्या ८८ व्या ( अठ्ठ्याऐशीव्या ) वर्षी जन्म दिला पाहिजे. हें व्यवहारतः शक्य आहे काय ? त्यांचा सर्व व्यूह कसा ढांसळतो हें यावरून दिसून येईल.

वासुदेवानें नाथ महाराजांचा रक्तसंबंधच तेवढा ध्यानांत धरला ... पण तो कशा प्रकारचा याकडे त्यानें दुर्लक्ष्य केल्यानें पुढील सर्व संशोधकाना विचार करीत बसावें लागलें. वरील सर्व विवेचनावरून मीं ठरविलेले निष्कर्ष कीं माधव स्वामींचा जन्म शके १५७० च्या सुमाराचा व त्यांची आई उमा ही नाथांच्या दुसऱ्या मुलीस नाथांच्या निर्याणानंतर झालेल्या मुलाची मुलगी असावी, व या मुलाचें नांव एकनाथ असावें, हेंच बरोबर असावें. विश्वासार्ह विरुद्ध पुरावा पुढें आल्यास माझे निष्कर्ष अर्थातच रद्द करावे लागतील. संशोधनांत हें कोणत्याहि क्षणीं घडेल.

---





अनुक्रमणिका

## वाचकांचा पत्रव्यवहार –

रा. रा. संपादक, नवभारत यांस,

नवभारत मासिकाच्या ऑगस्ट महिन्याच्या अंकांत प्रसिद्ध झालेला प्रा. नारायणशास्त्री द्रविड यांचा लेख वाचून हें पत्र लिहीत आहे. प्रा. द्रविड यांनीं श्री. वऱ्हाडपांडे यांच्या लेखावर टीका करतांना अनिर्वाच्य-वादी भूमिकेचें जें समर्थन केलें आहे त्याबद्दल मला कांहीं म्हणावयाचें नाहीं. परंतु त्यांच्या टीकेची पातळी आणि अनंताच्या गणिती कल्पनेबद्दल त्यांनीं केलेलें मतप्रदर्शन, या दोन गोष्टींबद्दल थोडें लिहिणें उपयुक्त ठरेल असें वाटतें.

प्रथम, प्रा. द्रविड यांच्या टीकेची पातळी. " लेख-कांनें ( म्हणजे श्री. वऱ्हाडपांडे यांनीं – अ. भि. श. ) अनिर्वाच्यवाद्यांचे ग्रंथ वाचले तरी आहेत काय ? " ; " त्यांनीं श्रीहर्षाचा काय किंवा इतर विद्वानांचा काय एकहि ग्रंथ वाचलेला नाहीं. " " केवळ विद्वत्तापूर्ण उत्तर आहे हें ? "; " बर्गसांच्या कोणत्याहि पुस्तकाचा किंवा त्यांतील विधानांचा त्यांनीं उल्लेख केलेला नसल्यामुळें नुसतें बर्गसांचें नांव ऐकूनच त्यावर त्यांनीं लेखांतील आक्षेप केले असावेत " – असे शब्दप्रयोग एका विशिष्ट भारतीय परंपरेला धरून आहेत हें खरें असलें, तरी वैचारिक पातळींवरच्या चर्चेंत कितपत इष्ट आहेत याचा विचार व्हावयास पाहिजे. मला वाटतें कीं, भावनेच्या भरांत लेखकाचा तोल सुटला असला तर त्याची चूक दाखवून पुनर्लेखनाकरितां त्याचें लिखाण परत करणें, हें संपादकाचें कर्तव्य आहे तसें न केल्यास चर्चा म्हणजे भांडण, संवाद नव्हे, असा अर्थ होईल; आणि असें झाल्यास खुद्द भारतीय संस्कृतीचें योग्य मूल्यमापन होऊं शकणार नाहीं आणि नवीन विचारांचाहि विकास होऊं शकणार नाहीं.

या मुद्यावर एवढें लिहिण्याचें कारण असें कीं चर्चेची अशी हीन पातळी केवळ प्रा. द्रविड यांच्या लेखांतच असते असें नसून महाराष्ट्राच्या सांस्कृतिक आणि सामाजिक जीवनांत ती पदोपदीं आढळते. इतर भाषिक राज्यांत परिस्थिति वेगळी आहे असें म्हणावयाचें नाहीं; परंतु त्याबद्दल प्रस्तुत पत्रलेखकाला पुरेशी माहिती नाहीं. इतकीं सभा संमेलनें होतात, इतके विद्वान जमतात, परंतु आपल्या समाज-जीवनाच्या या ' अनिर्वाच्य ' प्रकाराबद्दल सामान्यतः सर्व लोक गप्प असतात, हें असें कां, याचा उलगडा होत नाहीं.

असो. प्रा. द्रविड यांच्या लेखांत आलेल्या अनंताच्या गणिती कल्पनेबद्दल थोडें लिहून हें पत्र संपवितो.

१ २ ३ ४ ............................ I

२ ४ ६ ८ ............................ II

या दोन्हीं ओळींत संख्येनें सारखेच अंक आहेत, हें विधान " सपशेल चूक " आहे असें प्रा. द्रविड म्हणतात. ते पुढें म्हणतात, " वरील आक्षेप हा तात्त्विक स्वरूपाचा आहे. त्यामुळें अनंताच्या गणिती कल्पनेच्या Hypothetical किंवा Operational स्वरूपाला बाध येत नाहीं. तत्त्वज्ञानांत अपेक्षिला जाणारा कांटे-कोरपणा गणिताला आवश्यक नसतो." यानंतर "बर्ट्रंड रसेल यांनीं ५७ वर्षांपूर्वी आपल्या Principles of Mathematics या पुस्तकांत या विषयावर जीं अपरिपक्व मतें मांडलीं होतीं. " तीं कशीं चुकीचीं आहेत, आणि मध्यंतरींच्या काळांत या विषयावर मोठ-मोठ्या पाश्चात्त्य विद्वानांनीं जे नवनवे विचार मांडले त्यांची दखल न घेतां एका जुनाट विचारसरणीला श्री. वऱ्हाडपांडे दुराग्रहानें कसे चिकटून राहिले आहेत तें प्रा. द्रविडांनीं सांगितलें आहे.

वरील विधानें करतांना प्रा. द्रविड यांनीं मध्यंतरींच्या काळांतील एका तरी पुस्तकाचा, एका तरी लेखकाचा नांवानें उल्लेख केला असता तर बरें झालें असतें, श्री. वऱ्हाडपांडे यांच्याबद्दल ते म्हणतात तसें मला प्रा. द्रविड यांच्याबद्दल सुचवावयाचेंहि नाहीं; परंतु कोठल्याहि विशिष्ट तात्त्विक गणिती विचारसरणीच्या उल्लेखाच्या अभावीं प्रा. द्रविडांशीं मतभेद कसा व्यक्त करावयाचा, हा प्रश्न सुटत नाहीं. कारण गणिताच्या तत्त्वज्ञानांत आज तीन मुख्य विचारप्रवाह आहेत : फ्रेगे रसेल यांचा Logistic दृष्टिकोन, हिल्बर्ट याचा Formal दृष्टिकोन, आणि हर्मान वाईल व ब्रूवेर याचा Intuitionist दृष्टि-कोन. यापैकीं कोणाशीहि संपूर्णतः सहमत नसलेला Axiomatic दृष्टिकोन गेल्या कांहीं वर्षांत् पुढें येत आहे. लुडविग् विटगेन्स्टाईन यांचें Foundations of Mathematics हें पुस्तक या दृष्टिकोनाचें कांहीं अंशीं प्रातिनिधिक आहे. विटगेन्स्टाइनचा दृष्टिकोन फ्रिडरिश् वेझमन् याच्या Introduct-










to Mathematical Thinking ( Frederick Ungar Publishing Co. New York, 1951) या पुस्तकांत प्रतिबिंबित झालेला आहे. आणि गणिताचा व्यवस्थित अभ्यास ज्यांनीं केलेला नाहीं अशा वाचकांनाहि थोडा त्रास घेतल्यास बऱ्याच अंशीं समजूं शकेल असें त्यांतलें विवेचन आहे.

यापैकीं प्रा. द्रविड यांची भूमिका कोणाशीं जुळती आहे. किंवा तसें नसल्यास त्यांचे या विचारसरणींशीं मतभेद कोठें आहेत, हें त्यांनीं सांगितलें असतें तर बरें झालें असतें. "तत्त्वज्ञानांत अपेक्षिला जाणारा कांटेकोरपणा गणिताला आवश्यक नसतो" असें विधान वाचून जिज्ञासूला कांहीं बोध होत नाहीं. बरें हें विधानहि कितपत खरें आहे याची कल्पना ज्यांनीं गणित आणि तत्त्वज्ञान या दोन्ही विषयांचा आणि त्यांच्या २५०० वर्षांच्या इतिहासाचा थोडा मूलगामी अभ्यास केला आहे त्यांना सहज येऊं शकेल. येथें एवढेंच सांगितलें म्हणजे पुरे कीं गणिताला अपेक्षित असणारा कांटेकोरपणा स्वीकारल्यानंतर गेल्या कांहीं दशकांत तत्त्वज्ञानांत जी प्रगति झाली आहे ती त्याच्या हजारों वर्षांच्या पूर्वेतिहासांत झालेली दिसत नाहीं. याचें एक गमक म्हणून आज तत्त्वज्ञानांत चर्चिले जाणारे प्रश्न, आणि पूर्वी तत्त्वज्ञानांत महत्त्वाचे समजले जाणारे परंतु आज विचारांतहि न घेतले जाणारे प्रश्न ( उदा. ग्रीक तत्त्वज्ञ जीनो याचे प्रश्न ), यांचीं संख्या आणि त्यांचें स्वरूप यांच्याकडे बोट दाखवितां येईल.

प्रा. द्रविड यांनीं अनंताची गणिती कल्पना चुकीची म्हणून शेरा दिला आहे, आणि त्याच्या समर्थनार्थ "सम-विषम मिळून जितके अंक होतात तितकेच केवळ सम अंक होतात" या गणिती विधानाचा उल्लेख केला आहे. परंतु गणिताचें प्रत्येक विधान, तें खरें आहे कीं चूक आहे हें ठरविण्याकरितां, आपण स्वीकारलेल्या गृहीत तत्त्वांवर आणि कृतिनियमांवर अवलंबून असतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तसें केल्यास वर उल्लेख केलेलें विधान चमत्कारिक वाटणार नाहीं. दुसरें, कोठलीहि विशिष्ट गणितशाखा बाहेरील विश्वाला लागूं पडते कीं नाहीं, हा निरीक्षणाचा प्रश्न आहे. एवढेंच नव्हे तर या विश्वासंबंधींचे तात्त्विक प्रश्न गणिताच्या साहाय्यानें किंवा इतर प्रकाराच्या तार्किक विचारानें सुटूं शकतील कीं नाहीं, हेंहि अनेकदां त्या प्रश्नांचें स्वरूपीकरण ( Formulation ) सदोष आहे कीं निर्दोष आहे यावर अवलंबून राहील. कारण, विटगेन्स्टाइननें सांगितल्याप्रमाणें भाषेच्या मोहिनींतून मुक्त झाल्यावांचून मनुष्याची तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत प्रगति होणें अवघड आहे.

– अ. मि. शहा

---

रा. श्री. सम्पादक नवभारत यांस

सादर नमस्कार,

नवभारताच्या ऑगस्टच्या अंकांत माझ्या 'अनन्ताचा अन्त' या लेखावर टीका करणारा प्रा. द्रविड यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांतल्या माझ्या लेखाशीं सम्बद्ध असलेल्या मुद्यांवर माझें उत्तर येणेंप्रमाणें आहे.

( १ ) श्रीहर्षानें कांही निरुक्तींचा विचार करून त्यातले दोष दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. यावरून यच्चयावत् संभाव्य निरुक्ति दोषपूर्ण असल्याच पाहिजेत हें कसें सिद्ध होईल ? की श्रीहर्षानें उल्लेखिलेल्या निरुक्तींपेक्षां दुसऱ्या निरुक्ति सम्भवतच नाहींत असें प्रा. द्रविडांचें म्हणणें आहे ?

( २ ) भ्रम यथार्थ ज्ञानाशीं विसंगत असेल, पण त्यांत अन्तर्गत सुसंगति असूं शकते.

( ३ ) जी संख्या मोजण्याजोगी नाही तीहि निश्चित असूं शकते. शून्य मोजण्याजोगें आहे काय ? $\sqrt{-१}$ ही संख्या मोजण्या जोगी आहे काय ? $\sqrt{२}$ ही संख्या मोजण्या जोगी आहे काय ?

(४) प्रा. द्रविडांनीं संख्यांची संख्या व संख्यांची बेरीज यांत घोटाळा केला आहे. एक ते तीन या संख्याची संख्या तीन आहे. पण त्यांची बेरीज मात्र सहा आहे.

(५) अनन्त अंकांची बेरीज कशी करतां येते हें कोणत्याहि प्राथमिक बीजगणितांत आढळेल.

(६) बेरीज म्हणजे "विशिष्ट प्रकारची वाढ करण्याची प्रक्रिया" ही द्रविडांची व्याख्या आहे. गणिती तर्कशास्त्राची नव्हे. ज्या समूहांची बेरीज करायची असेल



अनुक्रमणिका

त्यांतील सर्व घटक ज्यांत आहेत व त्या व्यतिरिक्त दुसरे घटक नाहींत असा समूह म्हणजे बेरीज.

(७) प्रा. द्रविडांनीं गतीच्या शक्यतेची जी उपपत्ति माझ्या माथी मारली आहे ती माझ्या लेखांत नाहीं.

(८) 'काळ स्थिर आहे' असें प्रा. द्रविडांनी विधान केलें आहे. काळच स्थिर आहे तर अस्थिर कोण ?

(९) काळाची उत्पत्ति कोणत्या काळीं झाली हें विचारणें रविवार कोणत्या वारी येतो असें विचारण्या-सारखें आहे.

शेवटीं प्रा. द्रविडांनी माझा लेख काळजीपूर्वक वाचला नाहीं म्हणून खेद प्रदर्शित करून हें उत्तर संपवितो. येत्या नवभारताच्या अंकांत त्याला जागा द्यावी अशी विनंति आहे.

—नी. र. वऱ्हाडपांडे

---

## एक टिपणः—

### अर्थशास्त्रीय परिभाषेच्या निमित्तानें

अलीकडे अर्थशास्त्रावर मराठींतून अनेक पुस्तकें प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत. किंबहुना हिंदी वगळ-ल्यास अर्थशास्त्रावर मराठीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत इतकीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं दिसत नाहींत. याला दोन कारणें असावींत. मातृभाषा हेंच शिक्ष-णाचें माध्यम असावें असा दावा मराठी विचार-वंतांनीच प्रामुख्याने पुढे मांडला. आणि विद्यापीठां-तून मातृभाषेचें माध्यम सुरू करण्याची "घाई" मराठीप्रधान विद्यापीठानीच सुरू केली. "घाई" म्हणण्याचें कारण शाळेंतून इंग्रजी काढलें याचा पस्ताव महाराष्ट्रीयांना होत आहे. दुसरीं विद्यापीठें अद्याप विचार करीत निष्क्रीय राहिलीं आहेत याचेंहि त्यांना वैषम्य वाटत आहे.

मराठींतून अर्थशास्त्रीय विषय मांडण्याचा प्रयत्न फार पूर्वीपासून होत आला आहे. पण चटकन् ध्यानांत येण्याजोगें पुस्तक म्हणजे १९२९ सालचें "कर्वे व काळे" यांचें "भारतीय अर्थशास्त्र" होय. काकासाहेब गाडगीळ यांचें "ग्यानबाचें अर्थ-शास्त्र" १९४३ साली प्रसिद्ध झालें. १९४८ सालापासून आजवर प्रा. व गो. सहस्रबुद्धे यांनी अर्थशास्त्राच्या विविध अंगांची माहिती देणाऱ्या सहा-सात पुस्तकांची भर घातली आहे. प्रि. सुमन्त मुरंजन यांच्या बँकिंगवरील पुस्तकांचा याच कालांत समावेश होतो. तसेच श्री. सी. पं. खेर यांचींहि दोन पुस्तकें डोळयांत भरतात. एक "पैसा" व दुसरें "केन्स आणि शुम्पीटर यांचें अर्थशास्त्र." पुणे विद्यापीठांत मराठी माध्यम मान्यता पावल्यावर तदनुषंगाने अर्थशास्त्रावर गेल्या ११२ वर्षांत अनेक पुस्तकें झालेलीं आहेत — बाहेर पडत आहेत. उदा-हरणार्थ रा. म. गोखले यांचें "अर्थशास्त्रपरिचय," "पदवीपूर्व अर्थशास्त्र" — म. शं. आजगांवकर इ.

नागपूरकडेहि अर्थशास्त्रावर मराठींत पुस्तकें आढळतात. त्यांत प्रा. भा. ह. मुंजे, प्रा. सुरेशचंद्र बाळ, प्रा. श्री. आ. देशपांडे यांच्या पुस्तकांचा प्रामुख्याने उल्लेख करावयास पाहिजे.

या सर्व पुस्तकांतून आधी मराठी शब्द व पुढे लगेच कंसामध्यें इंग्रजी शब्द देण्यांत आलेले आहेत. कांहीं पुस्तकांच्या शेवटीं प्रत्येक लेखकाने आपली परिभाषा दिलेली आहे. प्रा. सहस्रबुद्धे तर तळटीपांत सबंधच्या सबंध इंग्रजी अवतरणें, वाक्यें देतात. इतकीं कीं वरील मराठी मजकूर त्याचें केवळ भाषांतर वाटावें. केवळ परिभाषा देणारें एकच पुस्तक प्रा. श्या. मा. कुलकर्णी यांचें "अर्थशास्त्र-परिभाषा" हें आढळतें.

वरील वाङ्मयाकडे पाहातां परिभाषेच्या दृष्टीनें दोन भेद स्पष्ट दिसतात. एक नागपूरकडील व दुसरी मुंबईकडील. प्रा. मुंजे यांची भाषा सोपी आहे. पण इतर नागपुरी वाङ्मय पाहिलें तर त्यावर रघुवीरीय छाप पडल्याचें आढळून येतें. उदाहरणार्थ, Bank अधिकोष, cheque आदेश, company

प्रमण्डल इ०. ही भाषा बोजड, न समजणारी व अव्यवहारी वाटते. मुंबईकडील परिभाषेंत चालू सोपे शब्द वापरायची प्रथा असली तरी ती कित्येकदां अतीशय सैल, ढोबळ व म्हणून अशास्त्रीय असल्याचें आढळून येतें, मुंबईकडील लेखकांचा दृष्टीकोन असा दिसतो की आपण आधी शब्द वापरायचे. कालौघांत ते घडत, ठाकठीक होत जातील. "परिभाषा प्रथम टांकसाळण्यापेक्षा उत्स्फूर्तपणें ती विकसत जावी" अशी श्री. खेर यांनी पळवाट काढली आहे.

प्रत्येक लेखकाची वेगळी म्हणून अर्थशास्त्रीय परिभाषेसंबंधीं बराच अनागोंदी कारभार हल्ली आढळून येत आहे. हें मी कांही वेचक शब्द घेऊन स्पष्ट करूं इच्छितो.

Abstinence याचा प्रा. कुलकर्णी, प्रा. मुंजे यांनी 'संयम' असा शब्द दिलेला आहे. पण संयम याचा रूढ अर्थ बराच सोज्वळ आहे. Regulation या अर्थी. Abstain म्हणजे परावृत्त होणें.

Debt, Debtor ला कर्ज, कर्जदार असे कुलकर्णी सहस्रबुद्धे यांचे शब्द आहेत. पण कर्जदार याला 'व्याज' ही कल्पनाहि चिकटलेली आहे. Debtor –Creditor या संज्ञा व्यापार-व्यवहारांत येतात व यांतील देण्याघेण्यावर सहसा व्याज आकारलें जात नाहीं. यास्तव देणेकरी घेणेकरी असे शब्द वापरावे लागतील.

Balance of payments ला कुलकर्णी यांनी व्यवहारशेष असा शब्द दिलेला आहे. तर सहस्रबुद्धे त्यासाठी "देण्यायेण्याचा तोल" असा प्रयोग करतात. येथील Balance हा शब्द 'बाकी' अर्थी वापरलेला आहे. (तराजूंतील) तोल या अर्थी नाहीं. श्री. खेर यास्तव "देणेयेणेबाकी" असा शब्द वापरतात.

Bank Rate ला सहस्रबुद्धे यांनी 'बॅंक रेट' च लिहिलें आहे. व स्पष्टीकरणार्थ "मध्यवर्ती बॅंकेचा व्याजाचा दर" असें म्हटलें आहे. हें स्पष्टीकरण दिशाभूल करणारें आहे. Bank Rate मध्ये जो व्यवहार अनुस्यूत आहे तो Rediscount Rate चा आहे. हुंड्या पुनः वटविणें. Bank Rate चा जर प्रभाव पडावयाचा असेल तर Bill Market (हुंडी बाजार) व Discount Houses (हुंड्या वटविणाऱ्या संस्था) स्थापन व्हावयास हव्यात व त्यांचा व्यवस्थित विकास व्हावयास हवा. बॅंकांकडे हुंड्या वटवावयास येण्याचें प्रमुख कारण हें की ठरलेल्या तारखेच्या (मितीच्या) आधी व्यापाऱ्यांना त्यावर पैसा हवा असतो. याला व्यवहारांत कटमिति म्हणतात. Discount rate म्हणजे कटमितीचा दर. Rediscount rate म्हणजे पुनश्च कटमितीचा दर. व्याजाचा दर हा अर्थ चुकीचा वाटतो.

Money म्हणजे पैसा. अर्थ अगदी सरळ आहे. पण कुलकर्णी-सहस्रबुद्धे यासाठी "चलन" हा शब्द वापरतात. तर आजगांवकर "द्रव्य" शब्द योजतात. Credit money आणि Currency यासाठी सहस्रबुद्धे पतचलन व रोखचलन असा भेद करतात. पण ते दोन्ही म्हणजे पैसा होय. मग सहस्रबुद्धे 'पैसा' हा साधा शब्द का वापरीत नाहीत ?

Bank Rate म्हणजे मध्यवर्ति बॅंकेचा व्याजाचा दर हा सहस्रबुद्धे यांचा अर्थ मानला तर cheap money policyची "अल्पव्याज नीति" मान्य करतां येईल. cheap moneyच्या धोरणांत मध्यवर्ति-पेढी सरकारी रोखे विकत घेते. व त्याचा परिणाम म्हणून व्याजाचा दर कमी राहातो. खेरांनी "स्वस्त पैशाचें धोरण" म्हटलें आहे "स्वस्त" पेक्षा कुलकर्णी यांचा "सुलभ" शब्द बरा वाटतो.

Gold Bullion Standard ला कर्वे व काळे यांनी सुवर्णखंडपरिमाण म्हटलें असून सुवर्णधातुपरिमाण या सहस्रबुद्धे-कुलकर्णी यांच्या शब्दापेक्षा अचुक वाटतो.



अनुक्रमणिका








Open Market Operations ला "खुल्या बाजारांतील व्यवहार" असें सहस्रबुद्धे यांनी म्हटलें आहे. पण तें सार्थ नाहीं. आजगांवकर यांचा 'खुल्या बाजारांतील रोख्यांची खरेदीविक्री' हा अर्थ किंवा खेरांचा 'रोख्यांचा क्रयविक्रय' हा प्रयोग योग्य आहे.

Exchange Bank चें कुलकर्णी आजगांवकर यांनी "विनिमय बँक" असें भाषांतर केलें आहे. पण येथे Exchange म्हणजे Foreign Exchange असून (परराष्ट्रीय) हुंडणावळीचा व्यवहार करणाऱ्या बँका असा अर्थ आहे. विनिमय हा येथील शब्दार्थ चुकीचा आहे. ... ...

Trade Cycle ला मुरंजन यांनीं तेजीमंदीचें रहाटगाडगें म्हटलें आहे. सहस्रबुद्धेहि तेजीमंदीचक्र असा प्रयोग वापरतात. Trade cycle अनेक अंगें (phases) असून तेजी आणि मंदी त्यांतील दोन उपांगें आहेत. शास्त्रतः प्रत्येक व्यापारी चक्रांत या उपांगांचा उद्भव होतोच असें नाही. 1. Expansion 2. Prosperity 3. Boom 4. crisis, crash 5. Recession 6. Depression. रूढ असलेल्या तेजी आणि मंदी यांचा अर्थ Boom आणि Depression असा होतो. Trade cycle ला तेजीमंदी हा अर्धवट व अपूर्ण शब्द आहे. या सहाहि अंगांना स्पर्श करणारा भाषांतरित "व्यापारी चक्र" व्यापारी मालचक्र असा शब्द वापरणें आवश्यक वाटतें. ...

Firm या शब्दाचें भाषांतरहि मराठींत वादग्रस्त झालेलें आहे. Firm ला पेढी असा शब्द मुंजे योजतात. पण पेढीला मराठींत एक ऐतिहासिक संकेत प्राप्त झाला आहे. तो म्हणजे व्यापारी (Trade), सावकारी पेढी. पेढीची विशिष्ट हिंदी बैठकहि (तक्क्यालोड) पेढी या शब्दांतून दृग्गोचर होते. पण इंग्रजी अर्थशास्त्रीय firm म्हणजे उद्योगधंदा. उत्पादकधंदा, उद्योग. व्यापार नव्हे.

असे अनेक शब्द आहेत. Marginal (सीमान्त, शेवटचा, काठचा, पारंकष); Savings (बचत, शिल्लक, संचय); Consumption (सेवन, उपयोग); Acceleration (प्रवेग, प्रवृद्धिप्रमाण), Innovation (शोध, नवी रीत); Quantity of money (चलननिधि, पैशाची पुंजी) Services (सेवा, श्रम—सेवा या शब्दास त्यागाची भावना चिकटलेली आहे.); Natural Resources (नैसर्गिक साधनें, नैसर्गिक द्रव्यें); Index numbers (निर्देशांक, सूचकांक) इत्यादि. हें सारें देण्याचें हें स्थान आहे असें मला वाटत नाही.

यावरून हें स्पष्ट होईल की काही प्राध्यापकांनी वापरलेले मराठी शब्द इंग्रजी अर्थाचा विपर्यास करणारे व चुकीचे आहेत. प्रचारतंत्राच्या पद्धतीने ते मराठी वाङ्मयांत रुळतीलहि. पण तसेंच तें रुळं देणें कितपत हितावह आहे याचा अर्थशास्त्रवेत्त्यांनी विचार करावयास पाहिजे. अर्थशास्त्राचा मराठींतून नेटकेपणाने अभ्यास व्हावयाचा असेल तर आता तरी एक सुव्यवस्थित परिभाषा तयार होणें अगत्याचें व अपरिहार्य होऊन बसलें आहे.

मध्यंतरी महाराष्ट्र साहित्य परिषद याबाबतींत कांही प्रयत्न करीत असल्याचें मीं वाचलें होतें. पण पुढे कुठे माशी शिंकली मला माहीत नाही. परिषदेप्रमाणेंच मुंबई, नागपूर, पुणे, मराठवाडा या मराठी विद्यापीठांनी व त्यांतील जाणकर विद्वानांनी स्वतःहून पुढाकार घेऊन अर्थशास्त्राच्या परिभाषेची निश्चिति करावी. असें मी त्यांना आवाहन करतों या विद्यापीठांकडून अशा उपक्रमाची (initiative) अपेक्षा करावी काय ?

— सुरेख पंडित








# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) | धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) | धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | ४५–०–० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... ... | ३०–०–० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ४ | १३५–०–० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | ६–०–० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | ५–०–० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | ६–०–० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... ... | २–८–० |
| (१०) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ३–०–० |
| (११) | चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | ३–०–० |
| (१२) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | २–८–० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) .... | १६–०–० |







अनुक्रमणिका